# हें जीवन !

लेखक

नारायण गंगोपाध्याय

अनुवादक

वि. गं. देशपांडे

किंमत साडेचार रुपये

## सप्रेम समर्पण

माझ्या जीवनाचे उद्धारक
बेळगांवांतील देवमाणूस
कै. स. ल. ऊर्फ **बाबासाहेब सोमण**

यांस—

श्री. नारायण गंगोपाध्याय यांच्या कांहीं कथांचा हा संग्रह वाचकांच्या हातीं देतांना मला अत्यंत आनंद होत आहे. मूळ बंगाली कथा वाचतांना मला आनंद झाला, त्या अनुवादितांना तो आनंद द्विगुणित झाला. "सत्यकथा" मासिकांत यांपैकीं कांहीं कथा प्रसिद्ध झाल्या, तेव्हां अनेकांनीं त्या आवडल्याचें अनाहूतपणें कळविलें, त्यामुळें माझ्या मनाला समाधान वाटलें. माझ्यासारख्या प्रसिद्धिविन्मुख माणसाकडून हा संग्रह प्रकाशनासाठीं घेण्याचें श्रेय श्री. रा. ज. देशमुख यांच्या चिकाटीला आहे !

श्री. नारायण गंगोपाध्याय यांचें खरें नांव तारकनाथ गंगोपाध्याय. त्यांचा जन्म १९१८ सालीं बंगालमध्यें दिनाजपूर जिल्ह्यांत बाहियाडांगी या गांवीं झाला. त्यांचें शिक्षण दिनाजपूर, फरीदपूर, बारिसाल व कलकत्ता येथें झालें. कॉलेजांत एक बुद्धिमान् विद्यार्थी म्हणून त्यांची ख्याति होती. १९४१ सालीं कलकत्ता विद्यापीठाची एम्. ए. परीक्षा ते पास झाले. बंगालींत त्यांनीं पहिला नंबर मिळविला. हल्लीं कलकत्त्याच्या सिटी कॉलेजांत ते बंगालीचे प्राध्यापक आहेत. लेखनाप्रमाणेंच त्यांना चित्रें काढण्याचाही नाद आहे !

श्री. गंगोपाध्याय याना वाचनाचा नाद विलक्षण आहे. त्यांची स्मरणशक्ति आश्चर्यकारक आहे. कोणत्याही वाचलेल्या पुस्तकाचे संदर्भ ते वाटेल त्या वेळीं देऊं शकतात; नेहमीं हंसतमुख चेहरा व शांत, विनयी आणि निरहंकारी स्वभाव यांमुळें मित्रमंडळींत ते लोकप्रिय आहेत. विद्यमान बंगाली साहित्यिकांत ते वयानें सर्वांत लहान असले, तरी त्यांची गणना इतक्यांतच पहिल्या श्रेणींतील साहित्यिकांत होऊं लागली आहे.

दैनिकाच्या रामरगाड्यांतून 'चोरलेल्या' वेळांत या कथांचें भाषांतर केलें. मूळ लेखकाची शैली भाषांतरांतही उतरविण्याकडेच अधिक लक्ष दिलें आहे. त्यासाठीं क्वचित् मराठीच्या प्रकृतीकडेही बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष केलें आहे.

वाचकांना हा प्रयत्न आवडला, तर इतर आधुनिक वंगीय कथाकारांच्या वैशिष्ट्यपूर्ण कथांचे संग्रह मराठींत अनुवादण्याचा बेत आहे.

३९ वल्लभ भुवन,<br>विठ्ठलभाई पटेल रोड,<br>गिरगांव ४

**वि. गं. देशपांडे**

## माझ्या कथालेखनाची कथा--

माझ्या कथालेखनाचा इतिहास मला सांगायचा आहे. पण इतिहास कसला सांगूं ? मागें वळून माझ्या विचित्र, स्वप्नातुर किशोरावस्थेंतील जीवनाकडे पाहिलें कीं त्या वेळीं कथा लिहिण्याचा 'व्यापार' मला स्वतःलाच जितका आकस्मिक, तितकाच विस्मयकर वाटतो !

माझे वडील पोलिसखात्यांत 'दारोगा' होते. आज नव्हे—वीस तीस वर्षांपूर्वी. त्या काळीं पोलिस संप्रदायाशीं जिची घनिष्ठता असे, ती देवी इतर कोणीही असो; ती सरस्वती नव्हती याबद्दल साक्षीपुरावा द्यायची मुळींच गरज नाहीं ! त्या काळीं फार लिहितां वाचतां येणें किंवा इंग्रजी उत्तम वाचतां येणें किंवा इंग्रजी उत्तम लिहितां येणें पोलिसखात्यांत अयोग्यतेचें निदर्शक मानण्यांत येई असें मीं ऐकिलें आहे !

पण माझे वडील आश्चर्य वाटावें इतके अपवाद होते. ते कॉलेजांत शिकलेसवरलेले होते. हुषार विद्यार्थी म्हणून त्यांची ख्याति होती. दरोड्याची खबर कळतांच तीस तीस मैल अंतर तोडून तेथें छापा घालून ते परत येत—माळापलीकडे शुभ्र आरबी घोड्यावर आरूढ झालेली, युनिफॉर्म घातलेली, गौरवर्णाची त्यांची पुऱ्या पांच हातांची मूर्ति मला आठवते. असेच एकदां ते आले. सईसानें धांवत येऊन घोडा धरला; वडिलांनीं घोड्याच्या पाठीवरून सरळ जमिनीवर उडी टाकली. कपाळावर घामाचे थेंब; साऱ्या शरीरावर उत्तर बंगालची तांबडी धूळ. पण घोड्यावरून उतरताच त्यांचा पहिला प्रश्नः—" नव्या पुस्तकांची व्ही. पी. आली आहे का ? "

वडिलांची लायब्ररीही चांगली होती. बंगाली पुस्तकांचे गठ्ठेच्या गठ्ठे येत. बंगालमध्यें जेवढीं म्हणून दैनिकें, साप्ताहिकें नि मासिकें होतीं, त्या सर्वांचे ते ग्राहक होते. नुसते ग्राहकच नव्हते, एकनिष्ठ वाचकही होते. माझ्या-

सारख्या लहान मुलांसाठीं ' खोका खूकू ' ' सन्देश ' ' मौचाक ' ' शिशुसाथी ' येत. असली साहित्यिक अभिरुची असलेल्या वडिलांनीं पोलिस खात्यांत नांव कसें कमावलें याचें मला आज देखील आश्चर्य वाटतें. त्यांना लिहिण्या-वाचण्यावांचून दुसरें कोणतेंही व्यसन नव्हतें. पान–तंबाखू ते अस्पृश्य मानीत. आणि मृत्यूच्या वेळीं देखील जॉन स्टुअर्ट मिल यांच्या-पासून तों मिल्टन, शेक्सपियर, वर्डस्वर्थ यांच्यापर्यंतच्या लिखाणांतील उतारे बिनचूक तोंडपाठ म्हणतांना मीं त्यांना ऐकलें आहे !

साहित्याबद्दलची माझी जी कांहीं आसक्ति अथवा अनुरक्ति आहे, ती सर्वस्वी मला वडिलांकडूनच मिळाली. त्यामुळें अक्षरओळखीबरोबरच कांहींशी अकाल पक्वताही माझ्यांत उतरली ! ' खोका खूकू ' वाचण्यांत माझें मन रमेना. ' भारतवर्ष'चा अंक लांबवून लपून छपून त्यांतील ' श्री कान्तेर भ्रमण काहिनी ' (मुळांत ' श्रीकान्त ' कादंबरीचें हेंच नांव होतें), देशबंधु दास यांच्या " नारायण " मधून " स्वामी " इत्यादि मी वाचून काढूं लागलों ! कितपत समजत असे कोण जाणें–पण वाचून मन डोलूं लागे ! आज माझ्या डोळ्यांसमोर फक्त उत्तर बंगालमधील तें छोटेंसें खेडें उभें आहे. आमच्या बिऱ्हाडासमोरच कृष्णचूडाचा कुंज व्याकुळ झालेला असे. त्या कुंजापलीकडे आत्रेय नदीचा निळा निळा प्रवाह वाहत असे. नदीपली-कडे लाल मातीची वाट घनदाट बासबनांतून कोठें जाऊन पोंचत असे तें मला कधींच कळलें नाहीं. या आश्चर्यकारक पार्श्वभूमीवर हें आश्चर्यकारक लिखाण मला जणूं मुग्ध करून ठेवी. ती अपरिचित वाट आणि बंगाली साहित्यिकांचें हें लिखाण यांच्यांत बरेंचसें साद्दश्य आहे असें मला वाटे.

मीं पहिल्यांदा लेखन सुरू केलें तेव्हां वडिलांनीं दिनाजपुर येथें एक घर बांधलें होतें. मी शाळेंत खालच्या वर्गांत शिकत होतों. सर्वच लेखकांच्या लिखाणाची सुरुवात काव्यापासून होते कीं काय कोण जाणे ! मीं मात्र प्रथम काव्यापासूनच प्रारंभ केला.

मी लहानपणापासूनच एकांतप्रिय. त्यांतच कविता लिहूं लागलों, त्यामुळें मीं स्वतःला अधिकच संकुचित करून घेतलें. लिखाणाबद्दल जसा संशय वाटे, तशीच लाजही वाटे ! आपण कांहीं तरी भलतेंच करीत आहों अशी टोंचणी असे. चोरून चोरून लिहीत असें ! लिहिल्यानंतर फाडून टाकीत

असें. लिखाणाबद्दल आपुलकी मुळींच नसे. सुदैवानें आज देखील स्वतःच्या लेखनाबद्दल माझी हीच वृत्ति कायम आहे.

एकांतपणें लेखनसाधना करावयाची तर एकांत जागा पाहिजे. अशी जागा कोठें मिळेल ? शोधतां शोधतां हवी होती तशी जागा सांपडली. त्या जागेसारखें साहित्यसाधनेसाठीं बादशाही आसन उभ्या जगांत कधीं कोणाला लाभलें असेल असें मला वाटत नाहीं.

घराच्या एका बाजूच्या व्हरांड्यांत मोडकींतोडकीं लांकडें आणि केरोसीनच्या डब्यांचें लांकडी पॅकिंग असलेले पेटारे यांचा ढीग होता. तो अगदीं छपरापर्यंत जाऊन भिडला होता. त्याच्या खालीं बागेंतील कौठांचा पिरामीड होता. पिकूं घातलेल्या कवठांचा मन मोहून टाकणारा वास मला किती आवडे ! या अडगळींत उंदिर मनमानेल तसे निर्भयपणानें फिरत. त्यांची गडबड अन् तें सुगंधित वातावरण याहून मोहक असें स्थान कोणतें असूं शकेल ? त्या दिवशीं मीं दौतटांक घेतला, कागदाची वही कांखेंत मारली आणि त्या ढिगावर जाऊन बसलों. घरच्या लोकांची नजर सहजासहजीं माझ्याकडे वळणें शक्य नव्हतें. त्यांतही एकाद्यानें पाहिलेंच असतें, तर मी कौठें खातों आहें असें अनुमान त्यानें काढलें असतें. मीं कौठें खाण्याबद्दल कोणाचीच हरकत नसे. कारण, लहानपणीं मलेरिया नी पोटदुखी इतकी भोगावी लागली होती कीं घरांतल्या सर्व मंडळींनीं मला देवाच्या दयेवरच सोडून दिलें होतें.

परंतु, कौठांतील रसापेक्षां उच्च दर्जाचा रस मला त्या वेळीं सांपडला होता. लाकडी पेटाऱ्यावर बसून मी वेदव्यासांची लेखणी हाताळीत होतों. कविता, गाणीं, राजकुमार मेघेन्द्रजित यांच्याशीं राजकन्या सुवर्णा हिचें प्रेम, महायुद्धावरचें महाकाव्य, एकलव्याची गुरुभक्ति विशद करणारें दणकेबाज नाटक (तेंही कवितेंत) लिहून काढायचें, स्वतःच वाचायचें; आवडलें नाहीं कीं फाडून टाकायचें, पुन्हा नव्यानें लिहायचें हा क्रम सुरू झाला. रॉबिन्सन क्रूसोप्रमाणें स्वतःच निर्मिलेल्या जगांत सीमाबद्ध होऊन निर्मितीचा आणि विलयाचा आनंद मी एकाच वेळीं उपभोगूं लागलों.

याच दरम्यान आनंदलहरी सेरीजमधील कित्येक रोमांचकारी पुस्तकें वाचून काढलीं होतीं. खून-दरवडयाच्या या कादंबऱ्यांनीं डोक्यात नवीनच

उत्तेजना आणून सोडली. मीं लिहून ठेवलेल्या अनेकविध साहित्य संसारांतून थोडथोडी सामुग्री घेऊन मीं एक नियतकालिक काढलें. त्याचें नांव 'चित्र वैचित्र्य' हें होतें. क्वारटर फुलस्केप आकाराचीं आठ पानें. संपादक, चित्रकार, लेखक, प्रकाशक आणि वाचक—सारें कांहीं मीच होतों! तीन कविता, संपादकीय आणि रहस्य रोमांचित एक कादंबरी—पहिल्याच हप्त्यांत दोन खून पाडून टाकले होते. माझी पहिली गोष्ट किंवा कादंबरी हीच!

दिनाजपूर येथील आमच्या त्या घरांत माझीहि लेखनकामाठी! त्या घरांत आंब्याची घनदाट सावली, खिडकीपलीकडून निरनिराळया फुलांचा व मोहरांचा गोड गोड वास; अंगणांत निरनिराळे खाद्यपदार्थ–पापड लोणचीं वगैरे–जरा पलीकडे घरांतली संताळ मोलकरीण बुधनी अंगावर कथलाचे दागिने घालून पांढरे शुभ्र दांत बाहेर काढीत हंसत हंसत भांडीं घांसत आहे. बाहेर दादाच्या खोलींतून त्याच्या संगीतसाधनेचा कर्णभेदी कोलाहल ऐकूं येत आहे. आणि अशा या सामान्य बंगाली सद्गृहस्थाच्या घरांत पॅकिंग-बॉक्सच्या चढणीस कठीण अशा पर्वतशिखरावर बसून फुलस्केप कागदाच्या अडीच पानात बंदुक, बॉम्ब, गुप्त भुयारें आणि भयंकर खून इत्यादि भानगडी करीत अस्मादिकांची स्वारी बसली आहे. तुम्हीच कल्पना करा म्हणजे झालें, अस्मादिकांचें लेखन सुरूंच आहे—

कार साध्य रोधे मोर गति
( मज अडविणें कोणाला साधेल ? )

असें कित्येक दिवस चाललें. पण एके दिवशीं मी सांपडलों. रिपन कॉलेजचे माजी प्रिन्सिपाल कै. वा. रवीन्द्र नारायण घोष यांचा एकुलता एक मुलगा सुधीन घोष हा माझा दोस्त होता. त्या दिवशीं तो मला खेळायला बोलावण्यासाठीं हांका मारीत आला. म्हणाला, " चल, आपण खेळायला जाऊं."

मीं म्हटलें, " अऽहं. मी गोष्ट लिहितों आहें. "

" गोष्ट !" सुधीन आश्चर्यानें थक्क झाला ! माझ्या सांगण्यावर त्याचा विश्वासच बसेना. तो म्हणाला, " बघूं तुझी गोष्ट. "

माझ्या ‘ चित्रवैचित्र्य ’ मधून कादंबरीचा एक हप्ता मीं त्याला वाचून दाखविला. डाउटिंग थॅामसचें एका क्षणांत किती परिवर्तन झालें ! मीं त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलें. उत्सुकता व कौतुक मोहरून आलें होतें. खेळण्याची गोष्टच तो विसरून गेला होता. म्हणाला, “ मग काय झालें ?”

मीं संपादकीय गंभीरपणानें उत्तर दिलें, “ याच्या पुढील कथाभाग पुढील अंकांत प्रसिद्ध होईल. ”

सुधीननें विचारलें, “ तुझ्या मासिकाची वार्षिक वर्गणी किती ?”

मीं म्हटलें, “ त्यासंबंधींची सारी माहिती या अंकांतच दिली आहे. जाहिरातीचे दर एका पानास दोन आणे. अर्ध्या पानास एक आणा. वार्षिक वर्गणी टपाल खर्चासहित चार पैसे. ”

सुधिननें लागलीच खिशांत हात घातला. घरांतून खाऊसाठीं मिळालेला एक आणा बाहेर काढला. माझ्या हातावर तो ठेवला व म्हटलें, “ मी होणार वर्गणीदार. ”

त्यानंतर माझ्या नियतकालिकाची वाढ झाली. हस्तयंत्रानें दोन प्रति निघूं लागल्या. पण, रहस्यमय कादंबरीनें माझ्या वर्गणीदाराला वेड लावलें होतें. तीन दिवसांनीं तो परत आला व म्हणाला, “ छे बुवा, फार उशीर होतो. तुझ्या मासिकाचें साप्ताहिक कर ना. ”

मी नव्या उत्साहानें त्या वेळीं दिवसांतून दोनदां दैनिक देखील काढलें असतें. मग साप्ताहिकाची काय कथा ? माझ्या पहिल्या भक्त वाचकाच्या विनंतीची उपेक्षा माझ्याच्यानें करवली नाहीं. ‘ चित्र-वैचित्र्य ’ साप्ताहिक झालें.

तें साप्ताहिक किती दिवस चालू होतें आणि त्यांतील कादंबरी संपूर्ण झाली कीं नाहीं तें कांहीं आठवत नाहीं. पण, एके दिवशीं सुधिन शिक्षणासाठीं दिनाजपुराहून वडिलांकडे कलकत्त्यास आला. तेव्हांपासूनच माझें तें साप्ताहिक नी माझी ती कादंबरी बंद पडली असावी.

त्यानंतर पुढें केव्हांही सुधिनची व माझी भेट झाली नाहीं. नंतर केव्हां तरी एकदां स्पोर्टस्‌मन सुधिनच्या मृत्यूची बातमी वर्तमानपत्रांत वाचली होती. पण, माझ्या त्या पहिल्या वाचकाचा विसर मला आजही पडलेला नाहीं आणि मरेतोंवर पडावयाचा नाहीं. आयुष्यांत मित्र लाभले आहेत.

त्यांत माझें लेखन आवडणारे चार दोन असतीलही. पण बाळपणींचा तो मुग्धभक्त यापुढें कितीही व कोठेंहि शोधला तरी सांपडावयाचा नाहीं. आज या निमित्तानें परलोकीं गेलेल्या माझ्या त्या बालमित्राबद्दल अंतरींची प्रगाढ कृतज्ञता व्यक्त करण्याची संधि मला लाभली. त्यामुळें मला धन्यता वाटत आहे.

× × × ×

दिवस जाऊं लागले. माझी कविकीर्ति वाड्यांतील मुलांतही पसरली होती. कवितांवर कविता जन्म घेत होत्या. वहींतील पानेच्या पानें भरून निघत होतीं. माझे मेहुणे श्री. शरद् वंद्योपाध्याय मला उत्तेजन देत होते. सारें कांहीं ठीक चाललें होतें.

याच सुमारास दुसरी गोष्ट लिहून झाली. तिची कहाणी मोठी विचित्र आहे. त्या वेळीं दिनाजपुरच्या मिडल इंग्लिश स्कूलमध्यें मी होतों. गणिताचा तास चालू होता. गोपीराय मास्तर हे गणितही शिकवीत, ड्रिलही शिकवीत; शरीरानें धिप्पाड, नामांकित खेळाडू. मुलांना चोपून काढण्यांत पटाईत. विद्यार्थ्यांना त्यांचा मोठा दरारा.

गणितांत मला कांहींच कळत नव्हतें. त्याबद्दलचें ज्ञान भोपळ्याएवढें ! तरी देखील गोपीबाबू माझ्यावर अत्यंत स्नेह करीत. माझ्यासारख्या दुबळ्या, मरतुकड्याच्या अंगावर हात उगारणें म्हणजे त्या पुरुष-सिंहाला कदाचित् कमीपणाचें वाटत असेल ! माझा दादा माझ्याच वर्गांत होता. वर्गांत आणि अंकगणितात हुशार विद्यार्थी म्हणून त्याची ख्याति होती. त्याच्या वहीवरून नक्कल करायची व ‘ होम–टास्क ’ संपवायचें असा माझा खाक्या होता.

गोपीबाबूंच्या तासाला पाठीमागल्या बांकाला आसरा घेतल्यावांचून गत्यंतर नव्हतें. फळ्यावरील आंकडे लिहून घेण्याची बतावणी करून मीं ‘ होम–टास्क ’ वहींत एक गोष्ट लिहून टाकली. नरेश चक्रवर्ति शेजारींच बसला होता. गणितांत तो माझ्याइतकाच प्रवीण होता. आपल्या वहींत गुलाबाचें फूल काढण्याचा प्रयत्न त्यानें केला होता. पण, गुलाबाऐवजीं दुसरेंच कसलें तरी फूल वहींत उमटलें होतें. गोष्ट संपतांच मी भानावर आलों. पाहतों तों काय ? नरेशची स्वारी मान उंचावून माझी गोष्ट वाचण्यांत तल्लीन झाली आहे.

वर्ग संपला. नरेश म्हणाला, "तुझी गोष्ट किती फक्कड झाली आहे. माझ्याजवळ दे ती. मी बांधून ठेवीन."

अशी फक्कड गोष्ट कोणी हातची जाऊं देईल का ? मीं ती गोष्ट त्याला दिली नाहीं. ती घरीं घेऊन आलों. माझ्या धाकट्या बहिणींना जमविलें आणि गोष्ट त्यांना वाचून दाखवूं लागलों.

हृदयस्पर्शी शोकान्त गोष्ट होती ती. तिचें नांव अजून आठवतें. पाशा–पाशी. (जवळ जवळ) फुलस्केप कागदाचीं तीन पानें. कथेची विषयवस्तुही शेजारी शेजारी दोन घरें. एकांत श्रीमंत, दुसऱ्यांत गरीब राहत असत. पावसाळ्यांत एके दिवशीं संध्याकाळीं श्रीमंतांच्या घरीं चहापानाची पार्टी चालू होती. त्याच वेळीं गरिबाच्या घरांतील मुलगा औषधाविणें मरण पावला.

माझ्या बहिणींचे डोळे ज्या वेळीं पाण्यानें भरून आले होते, त्याच वेळीं मोठ्यानें हंसूं ऐकूं आलें. माझे आतेभाऊ महेन्द्रबाबू केव्हांपासून माझी गोष्ट ऐकत होते कुणास ठाऊक. त्यांचा साहेबी खाक्या, नेहमीं दार्जिलिंगला राहणें. अंगांत नेहमीं सूट-बूट आणि तोंडांत नेहमीं जळती सिगारेट.

गोष्टींत एके ठिकाणीं मांसाच्या कचोरीचा उल्लेख होता. तो ऐकून त्यांना हंसूं अनावर झालें. " मांसाची कचोरी ? कधीं कोणी पाहिली–ऐकली आहे का ? " Nonsense and Absurd ! Rubish !"

मांसाची कचोरी त्या वेळेपर्यंत मीं कधीं खाल्लेली नव्हती. नांव कोठें तरी ऐकलेलें होतें. त्यामुळें मी चांगलाच वरमलों. अगदीं बर्फ झालों ! वाटलें, माझ्या गोष्टीची अशी चेष्टा. अगदींच रद्दी असली पाहिजे ही गोष्ट. वही कांखेंत मारली आणि तेथून पळ काढला, दूर गेलों आणि गोष्टीच्या चिंधड्या चिंधड्या करून टाकल्या. झालेल्या अपमानानें त्या दिवशीं डोळ्यांतून अश्रुधारा गळल्या.

मांसाची कचोरी होते आणि ती चांगलीही होते हें मला माहित आहे तुम्हा सर्वांच्या आशीर्वादानें माझ्या अर्धांगीनें अनेक वेळां मांसाच्या कचोऱ्या तयार करून मला खाऊं घातल्या आहेत. जोंवर ती जिवंत राहील, तोंवर आणखीही अनेक वेळां त्या कचोऱ्या ती मला करून घालील. पण, त्या दिवशींच्या संशयानें माझ्या गोष्टी लिहिण्याच्या स्फूर्तीच्या मुखावर धोंड ठेवली. त्यानंतर गोष्ट लिहायला बसलों कीं, वर्ड्सवर्थच्या 'ओमिनस गॉक'.

प्रमाणें मांसाची कचोरी मला भेडसावूं लागली. गोष्टी लिहिणें हा अव्यापारेषु व्यापार आहे असें माझ्या मनानें घेतलें, आणि मीं तो नाद सोडून दिला.

कविता मात्र लिहीत असें मी. ' मास पयला ' पत्रिकेंतील लहान मुलांच्या विभागांत माझ्या कवितेला बक्षिस मिळालें. आनंदानें, अभिमानानें ऊर भरून आला. हळू हळू वय वाढलें. मॅट्रिक पास झालों. ' देश ' साप्ताहिकाच्या पानांत माझी काव्यमय बडबड छापून येऊं लागली. ' देश ' चे त्या वेळचे सहसंपादक पवित्र गंगोपाध्याय–बंगाली साहित्य सृष्टींतील पवित्र दा–मला हरतऱ्हेनें प्रोत्साहन देऊं लागले. त्यांच्या स्नेहाच्या ऋणाची फेड माझ्याच्यानें या जन्मांत व्हावयाची नाहीं.

त्या वेळीं बारिसालच्या व्रजमोहन कॉलेजांत मी इंटर आर्ट्सच्या वर्गांत शिकत होतों. पवित्र दाचें तांतडीचें पत्र आलें. गोष्ट लिही.

गोष्ट लिहूं ? पण, लिहायचें काय ? कांहीं दिवसांपूर्वी फरीदपुर येथें असतांना कांहीं गोष्टी लिहिल्या होत्या. पण, त्या भयंकर जहाल होत्या. शृंखलाबद्ध देशमातेसंबंधींच्या जळजळीत गोष्टी होत्या त्या. पवित्र दाच्या पत्रानें मला संकट घातलें.

त्याच सुमारास बंगाली साहित्यांतील कांहीं लेखकांनीं व त्यांच्या कृतींनीं माझ्या मनाला विलक्षण मोहिनी घातली होती. अचिंत्यकुमार सेनगुप्त यांच्या गोष्टी, ताराशंकर वंद्योपाध्याय यांची खड्ग ही फॅन्टॅस्टिक रचना, मनोज बसु यांचें ' वन मर्मर ' हें पुस्तक आणि उगवते लेखक माणिक वंद्योपाध्याय यांच्या ' पुतूल नाचेर इति कथा ' इत्यादिकांनीं माझ्या मनाला वेड लावलें होतें. मोपासां व बाल्झाक यांच्या गोष्टी वाचायला सुरुवात केली होती. मला आवडत्या अशा या सर्व लेखकांची छाप असलेली अशी ' निशीथेर माया ' ही माझी पहिली गोष्ट ' देश ' मध्यें प्रसिद्ध झाली. माझें वय त्या वेळीं १७–१८ वर्षांचें होतें. त्या वयाला अनुरूप अशी रोमँटिक, रहस्यमय, स्वप्नमय अशी एक गोष्ट लिहून काढली. तीच ती ' निशाथेर माया '

पवित्र दा खूष झाले. गोष्टींना बहर येऊं लागला. कवितेला विसरलों. 'देश'-नंतर 'विचित्रा,' त्यानंतर 'शनिवारेर चिठी' आणि मग या त्या झाडून साऱ्या नियतकालिकांत गोष्टी प्रसिद्ध होऊं लागल्या. 'शनिवारेर चिठी'चे संपादक

सजनीकांत दास, ‘ विचित्रा ’ चे संपादक उपेन गंगोपाध्याय यांच्यासारखे स्फूर्तिदाते, चाहते मिळाले. स्वत:च्याच आनंदांत मग्न होऊन लिहीत राहिलों.

कीर्तीच्या आकर्षणानें मला कधीं लुब्ध केलें नाहीं. माझें लिखाण कोणाला कसें आवडेल याची पर्वा केली नाहीं. कोणी टीका केली, कोणी स्तुति केली; त्यांची दखल मीं कधींच घेतली नाहीं. स्वत:च्या आनंदासाठीं लिहीत राहिलों, लिहीत असतों ! मला चांगली वाटली कीं पाठवितों. प्रसिद्ध होतात. नावडलेल्या गोष्टी फाडून टाकतों. माझ्या किती तरी गोष्टी मीं अशा रीतीनें विस्मृतीच्या वाऱ्यावर सोडून दिल्या आहेत.

हाच क्रम आज चालू आहे. माझ्या गोष्टी ज्यांना आवडतात, त्यांना यानंतरच्या गोष्टी माहित आहेत.

माझा कथा-लेखनामागला इतिहास तो एवढाच, कीं इतिहासांत अनेक लहानसहान सुखदु:खें, आघात-प्रत्याघात मिसळून गेले आहेत. त्यांची आठवण आज नाहीं. पण, हा इतिहास अगदीं साधारण आहे. माझा परिचय करून घ्यायचा असेल तर तो माझ्या जीवनांत नाहीं. मीं लिहिलेल्या गोष्टींत आहे.

मी गोष्टी लिहितों. कादंबऱ्याही लिहितों. कांहीं लिहून झाल्या आहेत, किती तरी लिहून व्हावयाच्या आहेत. त्यांचें खरोखरीचें मूल्य काय आहे कोण जाणे ! माझी शक्ति मर्यादित आहे. जें करावेंसें वाटतें तें हातून घडत नाहीं. कदाचित् घडणारही नाहीं. या व्यर्थतेबद्दल मनांत क्षोभ नाहीं. स्वत:च्या मर्यादांसंबंधीं डोकें शिणवावयाचे नाहीं. कवि गुरूच्या शब्दांत माझ्या मनाला सांत्वन लाभतें:—

**आभार कीर्तीरे आमि करिना विश्वास**<br>
**जानि काल सिंधु तीरे**<br>
**नियत तरंगा घाते दिने दिने दिबे लुप्त करि**<br>
**...ए विश्वेरे भालो बासियाछि**<br>
**ए भालोबासाइ सत्य ए जन्मेर दान।**<br>
**विदाय नेबार काले**<br>
**ए सत्य अम्लानह्ये मृत्यूरे करिबे अस्विकार**

## ' जाळें '

**सं**साराश्रमांत राहण्यांत आतां मुळींच अर्थ नव्हता !

निदान सुंदरलालचा मोह तरी आतां तुटला होता. तुझा आजचा मित्र उद्यां क्षुल्लक स्वार्थाखातर तुझा गळा दाबायला तयार ! ज्या पाठच्या भावावर तुझें प्रेम, क्षणभरही ज्याची ताटातूट सहन होणें कठीण, तो वावभर जमिनीसाठीं उद्यां तुझ्यावर फौजदारी करायला कमी करायचा नाहीं ! ज्या सुंदर स्त्रीच्या पायीं हाडाचीं काडें करून तुम्ही साड्या-दागिन्यांचा नैवेद्य चढवीत आहांत, ती एकाद दिवशीं पहाटेस गांवच्या छट्टू तिवारीबरोबर रातोरात बेपत्ता झालेली दिसायची कदाचित् ! सुतराम् मोह-मुदगराच्या भाषेंत एकादे दिवशीं 'का तव कान्ता कस्ते पुत्रः' म्हणून संसार सोडून बाहेर पडणें हेंच शहाणपणाचें !

आणि सुंदरलाल खरोखरीच शहाणा, बुद्धिमान् ! म्हणून तर तिशी उलटते न उलटते तोंच संसार सोडून त्याची अगस्तीयात्रा सुरू झाली ! आतां त्याचा कोणही मित्र त्याचे पाय मागें ओढीत नाहीं ! रेडा चोरल्याबद्दल गांवच्या जमीनदाराशीं आतां खटलामामला करावा लागत नाहीं. छट्टू तिवारीच्या संशयास्पद हालचालीवर नजर ठेवण्यासाठीं रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून नि कान खडे करून बसून राहण्याची जरूर नाहीं ! सारी शक्ति एकवटून फत्तरासारख्या कठिण तांबड्या जमिनींत नांगर चालवायची, पेरणी करायची, मिळेल तें पीक काढायची कटकट आतां उरलेली नाहीं. वर्षभर पोट कसें भरणार या फिकीरींत राहण्याची गरजही आतां उरलेली नाहीं !

कोठें हें आतांचें जीवन नि कोठें तें ! दोघांची तुलना तरी होऊं शकेल का ? समोर एकाद्या सुंदर चित्रासारखा निळा निळा पहाड, त्याच्या सर्वांगावर संताळ परगण्यांतील अपूर्व वनश्री नटलेली ! दुमका येथें जाणारा रस्ता

पहाडाच्या अंगाला लागूनच दूर दूरपर्यंत गेलेला. त्या रस्त्यावरून जाणाऱ्या मोटरींतील जळत्या पेट्रोलची दुर्गंधी इथल्या आकाशाला, वाऱ्याला, यत्किंचितही त्रास देत नाहीं ! हॉर्नच्या विकट आवाजानें भयग्रस्त जनावरांचीं वांसरें इथें धापा टाकीत पळत सुटत नाहींत. लाल रंगाच्या मोठ्या बसमधून एकादी जळती सिगरेट किंवा रेशमी साडीची झळक एका क्षणभरांत एका चंचल जगाची बातमी सांगून जात असते. पण इथें तसली कांहींच धास्ती नाहीं !

इथें जंगलांत डुमडुम करीत नगारा वाजतो, ढोल, मृदंग वाजतो. वाऱ्याच्या झुळुकांसरशीं सुंदर स्वप्नासारखीं शालवृक्षाचीं फुलें उडून जातात. मोहाच्या झाडांची राई व्याकुळ झाली कीं, लहान लहान गुलाबजामसारखीं महुयाचीं फुलें कडवट मधुर रसानें रसरशीत टचटचीत होतात आणि त्याच्या मादक सुगंधानें फुलपांखरें आणि मधमाशा यांचे थवेच्या थवे येतात नि फांद्याफांद्यावर, पानापानांवर नाच सुरू करतात. हें दृश्य पाहिलें कीं, सुंदरलाललाही नशा चढल्यासारखें होई. खराखुरा आनंद कोठें असेल तर तो इथेंच–या इथेंच ! मोतीहारी येथील कोर्टकचेऱ्यांत फौजदारी खटल्यांत वकिली–दलाली करणाऱ्यांना किंवा सीतामढीमधील साखर कारखान्यांत उसाची दलाली करीत आयुष्याचा अपव्यय करणाऱ्यांना याचें मर्म काय कळणार ?

त्यांना नसेल कळत तर न कळो, सुंदरलालला मात्र तें मर्म कळलें होतें. येथील संताळांच्या मनावर त्यानें आपली मोहिनी टाकली होती, छाप बसविली होती. ते त्याच्याकडे श्रद्धेनें बघत; आतां आतांशा विश्वासही ठेवीत. सुंदरलालनें भगवीं वस्त्रें धारण केलेलीं नव्हतीं हें खरें; पण तरी दिखील तो संन्यासीच होता. तो दंडी संन्यासी कीं ब्रह्मचारी संन्यासी या प्रश्नाच्या उत्तरासाठीं संताळ कधींच अधीर होत नसत. सुंदरलालला लोकांचा हात पाहतां येतो, भविष्य सांगतां येतें. त्यानें सांगितलेलें भविष्य तंतोतंत खरें उतरतें म्हणे ! जडी–बुटीचें ज्ञानही त्याला होतें. त्याच्या बटव्यांतील औषधांच्या मात्रा तर मोठमोठ्या दुःसाध्य रोगांवरही रामबाण ठरतात–निदान संताळांचा तरी असा समज होता !

तो शैव, कीं रामायत् , कीं गाणपत्य, याबद्दल तर्कवितर्काला वाव आहे; पण कोणत्याही दैवताचा त्याला तिटकारा नाहीं असें मात्र सर्वांच्याच अनुभवास येई. ' बम् भोला ! ' म्हणून तो गांजाचा दम मारी. तुळसीदासाचें रामायण सुरांत गाई. ' बोंगा 'च्या पूजेंत कोंबडी बळी देणाऱ्यांच्या पूजेसही तो जाई. प्रसाद घेतांना त्यानें कधीं संकोच मानल्याचें आजवर तरी कोणास माहित नाहीं. तसें पाहिलें तर त्याला इथें येऊन अवघे दोनच महिने झाले. पण इतक्या अल्पावधींतच मुंदरलालनें महापुरूप सुंदरलाल होण्याचा उपक्रम चालविला होता !

आकाशांत संध्यारंग पसरला होता. संताळ परगण्याच्या पर्वतावरील अरण्यमंडित शिखरांशिखरांवर दाट छाया पसरूं लागली होती. शालवनानें घेरलेल्या दूरवरच्या प्रदेशांतून जी लहानशी वाट वेडींवांकडीं वळणें घेत घेत पलीकडे दिसेनाशी झाली होती, तिच्याकडे पाहिलें म्हणजे एकाद्या प्रचंड मृत राक्षसाचे निश्चल बाहूच पसरलेले आहेत कीं काय—मरायच्या आधीं हा पहाडच आपल्या घशांत ओढून घेण्यसाठीं त्यानें निकराचा अंतिम प्रयत्न केला असावा कीं काय—असा भास होई !

—आणि त्या पहाडांतील त्या रस्त्यानेंच सुंदरलालचें भूतानी खेंचर उतरून आलें. सुंदरलालच्या संन्यासांतील एकच एक साथी म्हणजे तें खेंचर ! नंग्या संन्याशांना लोट्याचिमट्याची सोबत जशी अपरिहार्य असते, तशीच त्या खेंचराची सोबत सुंदरलालला अपरिहार्य होती. सुंदरलाल संन्यासी होता हें खरें. पण अगदीं बाबा भोलानाथासारखा अंगाला नुसती राख फांसून, निरंकुश होऊन कांहीं तो बाहेर पडला नव्हता. खाण्यापिण्याची, वस्त्रप्रावरणाची व्यवस्था करूनच तो बाहेर पडला होता. म्हणूनच तळ हालविते वेळीं सामानसुमानाचें गांठोडें खेंचराच्या पाठीवरच बांधावें लागे. शिवाय कां कोण जाणे, आठवड्यांतून निदान एकदां तरी त्याला शहरांतून फेरी मारून यावें लागे. कदाचित् शिष्य-सामन्तांना दर्शन घेण्यासाठींही ही फेरी सुंदरलालला मारावी लागत असे. त्यामुळेंही खेंचराला वगळून त्याचें चालण्याजोगें नव्हतें.

छोटया छोटया पावलांनीं खट् खट् खट् खट् करीत, हिंडत हिंडत खेंचर संताळ वस्तींतच येऊन उभें राहिलें. सुंदरलालनें माथ्यावरलें मुंडासें सोडलें.

नि रस्त्यावर उडी टाकली. कच्च्या चामड्यानें बनविलेल्या त्याच्या जुन्या चढावाच्या नालाचे खिळे रस्त्यावर आपटले. कर्कश आवाज झाला, आणि त्या आवाजाबरोबरच त्याच्या लांबलचक मळकट डगल्यांतील मोठ्या खिशां-तल्या नाण्यांचा आवाज खणखणून उठला !

फार लांबून यावें लागलें होतें त्याला. खेंचराला व्यायामही कांहीं कमी घडलेला नव्हता. त्याच्या तोंडावर फेंस दिसत होता. दोरीची लगाम हातीं घेऊन 'चल–चल' करीत सुंदरलाल आपल्या खेंचराला घेऊन पुढें निघाला.

" कुठून आलांत स्वामीजी ?"

हा प्रश्न ऐकून सुंदरलालनें मान वर करून पाहिलें. समोर झडू संताळ उभा होता. गांवचे लोक त्याला मुखिया म्हणून मानीत. अंगावर फक्त एक लंगोटी ! माथ्यावरल्या वाढलेल्या केसांना सांवरण्यासाठीं चिंधीवजा कापड बांधलेलें. त्या चिंधीच्या एके बाजूस तीन पिसें खोवलेलीं, हातांत बांबूचें धनुष्य-आणि कांहीं बाण !

" काय रे, किती शिकार मिळाली ? कसली शिकार मिळाली ?"

" शिकार कुठली, स्वामीजी ? आज कांहींच गवसलं नाहीं ! महुया वनांत गेलों होतों. पण लाग नाहीं लागला ! माझं असो; पण तुम्ही कुठून आलां ? "

" मी ?..." सुंदरलालचा चेहरा प्रशान्त हंसण्यानें उजळला. त्याचें हें हंसणें आध्यात्मिक मानले तरी चूक ठरायचें नाहीं. साधनेच्या वाटेवर सुंदरलालनें किती प्रगति केली आहे त्याचें अनुमान त्याच्या या हंसण्यावरून करतां आलें असतें !

" मी ? " सुंदरलाल उत्तरला, " मी गेलों होतों त्या पल्याडल्या गांवीं ! तिथं भुतानं पछाडलं होतं एकाला. त्याचा कोणी तरी नातलग आला आणि रडत रडत धरणंच धरून बसला. मग काय करणार ? गेलों तिथं, झाडून टाकलं भूत आणि आलों इथं ! "

झडूनें मोठ्या आदरानें, भक्तिभावानें सुंदरलालला एकवार आपादमस्तक पाहून घेतलें. त्याच्या मनांत आलें, " खरंच ! या सुंदरलालच्या शरीरावर संन्याशाचीं कसलींच लक्षणं नाहींत ! केंस व्यवस्थितपणें उलटवलेले. अंगर-

ख्यांत हात घालून पितळेची डबी बाहेर काढून, तंबाखू-मिश्रित पानाचा विडा खुशाल तोंडांत टाकतो कीं हा! विडयांतला जर्दा चांगलाच उंची असला पाहिजे. नाहीं तर त्याचा इतका सुवास कसा आला असता? आणि चालतां चालतां त्याच्या खिशांत खुळखुळणाऱ्या रुपयांचा हा आवाज!... पण हें सारं असूनही सुंदरलाल साधु नाहीं अशी शंका कशी घ्यायची?...”

मुग्ध विस्मयानें झट्टूनें विचारलें, “ भूत झाडून टाकलं?”

“ हें काय विचारतोस? टाकलं म्हणजे काय, टाकलंच—अगदीं गाडून टाकलं! मंत्र म्हणजे मंत्र! थट्टा नाहीं कांहीं! मंत्रांचा प्रभावच तसा विलक्षण! माझे गुरु नंगाबाबा हिमालयाच्या शिखरावर बसून पांचशें वर्षें ध्यानधारणा करीत आहेत. त्यांची ती पांढरी शुभ्र लांबलचक दाढी थेट त्यांच्या पावलापर्यंत लोळण घेते! नंगाबाबा उभे राहिले कीं त्यांचं माथं तालवृक्षाच्या शेंडयाला जाऊन भिडतं. त्या वेळीं मी नेपाळांत पशुपति-नाथाच्या मंदिरांत तप करीत होतों. एक दिवस काय झालं! मध्यरात्रींचा काळाकुट्ट अंधार चहूंकडे पसरलेला होता. पण काय चमत्कार! अगदीं अवचितपणं जणूं पुनवेच्या चंद्राचा प्रकाश चोहोंकडे पसरला. डोळे उघडले. पाहिलं तों नंगाबाबांची मूर्ति दिसली. माझ्या मागं उभे राहून नंगाबाबा गालांतल्या गालांत हंसत होते!...”

या वेळीं सूर्य मावळला होता. पायतळीं शालवृक्षाचीं सुकलीं पानें घिर-घिरत होतीं. भीतीनें झट्टू संताळच्या अंगावर कांटा उभा राहिला. त्याचें सर्वांग थरथरूं लागलें.

“ मग काय झालं? ” त्यानें धीर करून विचारलें.

“ मग काय? ” सुंदरलालच्या आवाजांतून अभिमान ओसंडूं लागला. नंगाबाबांनीं सांगितलें, ‘ जा बेटा पहांट झाली आहे. आजपासून तुला सिद्धि मिळाली. भुतंखेतं, समंध, देवचार तुझी नुसती सांवली दिसली कीं पळायला लागतील! पळतां भुई थोडी होईल त्यांना!’ ”

संध्याकाळ दाटत चालली होती. दोहों बाजूंच्या वनाजंगलामुळें छाया अधिकाधिकच दाटत होत्या. सुंदरलालचा चेहरा दिसत नव्हता, तरीही झट्टू संताळानें तो चेहरा पाहण्याचा प्रयत्न केला. आपण एवढ्या थोर

माणसाबरोबर इतक्या जवळून चाललों आहोंत या विचारानेंच त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले !

वनांतला रस्ता ओलांडतांच समोर एक गांव दिसलें.

आकाशाच्या एका कोंपऱ्यांत ह्या वेळेपर्यंत शुक्ल त्रयोदशीचा चंद्र कोठें लपून बसला होता कोण जाणें ! आड आलेल्या जंगलाचा भेद करतांच त्या चंद्राचा झिळमिळता प्रकाश खडी पसरलेल्या रस्त्यावर पडला !

संताळ वस्तींत ढोल ऐकूं येत होता. महूयाच्या सुगंधासंगें या ढोलाच्या आवाजाचें छंदोगत ऐक्य आहे याची जाणीव होत होती !

झड्डू संताळानें विनयानें विचारलें, " सुन्दरलालजी, नाच पाहायला चलतां का ? "

" नाच ?...अच्छा...चल ! "

चाहों बाजूंस मातीचीं छोटीं छोटीं घरें. मध्यें खुली जागा. त्या जागेंत नाचाची बैठक बसली होती. दोन काळेकभिन्न पुरुष डौलानें ढोल वाजवीत होते. त्यांच्या तालावर कित्येक संताळ स्त्रिया नाचत होत्या. परस्परांच्या बाहूंच्या आलिंगनांत त्या बांधलेल्या होत्या. त्यांच्या तोंडून गाण्याचे अस्फुट स्वर ऐकूं येत होते. त्या गाण्याची भाषा सहजासहजीं समजण्याजोगी नव्हती; पण त्या गाण्याचा ध्वनि मात्र विचित्र गुंजनासारखा ऐकूं येत होता.

सुंदरलाल येत आहेसें दिसतांच ढोल थांबला. नाचही थांबला.

नाचणारणींच्या काळ्याभोर डोळ्यांत कौतुकाची उज्ज्वल आभा पसरली. पुरुषांच्या कंठांतून भक्तिमुग्ध आवाहनें बाहेर पडूं लागलीं. कांहीं जण तर उठून सामोरे आले. त्यांनीं सुंदरलालला नमस्कार केला. कांहीं जणांनीं कुठून तरी एक लोखंडी खाट त्याला बसण्यासाठीं आणून ठेवली.

सुंदरलालनें आपली मानमर्यादा संभाळून, गंभीरपणानें चौपाईवर बैठक मारली. पुरुष मंडळी त्याच्या भोंवतीं कोंडाळें करून बसली. बायका मंडळी, नाकांतल्या चांदीच्या नथेवर बोटें ठेवून, अबोधपणानें बोटाआडून पाहत राहिल्या.

सुंदरलाल गंभीरपणानें म्हणाला, " मंडळी, तुम्ही नाच कां थांबविला ? चालूं द्या ना ! "

झड्डू संताळही म्हणाला, “ हां, हां, चालूं द्या—चालूं द्या ! स्वामीजींना दाखवा आपलं कौशल्य ! असा झक्क होऊं द्या नाच—!”

पुन्हां ढोल वाजूं लागला. ह्या वेळपर्यंत चंद्र बराच वर आला होता. स्त्रियांच्या उज्ज्वल डोळ्यांवर, त्यांच्या नीटस बांध्याच्या शरीरसौंदर्यावर ज्योत्स्ना तरल लावण्यासारखी ओसंडूं लागली. संसार-विरक्त सुंदरलाल स्वतःला नकळतच आसक्त बनूं लागला. त्याचें रक्त जोरानें वाहूं लागलें. मनावर, डोळ्यांवर एक विलक्षण धुंदी चढूं लागली !

दहा बारा स्त्रिया एकत्र नाचत होत्या. प्रौढांपासून बालिकांपर्यंत सर्वांचा समावेश त्यांत होता. पण त्यांत तरुणींच जास्त होत्या. कदाचित् अल्पावधींत त्या म्हाताऱ्या होत नसाव्यात, कदाचित् त्यांचें यौवन नेहमींच वयाचा हात धरून चालत नसावें, असा विचार सुंदरलालच्या मनांत आला. त्याला आपल्या संसाराश्रमाची आठवण झाली. तसें पाहिलें तर अजून आपल्या पत्नीनें विशीदेखील ओलांडलेली नाहीं. पण—

त्याची तंद्री तुटली ! मोहाच्या मद्याचें भलें मोठें भांडें समोर आलेलें त्याला दिसलें. झड्डू संताळनें विनंति केली, “ स्वामीजी, प्रसाद करून द्या याचा ! ”

सुंदरलालनें हरकत घेतली नाहीं, कां कूं केलें नाहीं. संन्यासाच्या शेवटच्या पायरीवर चढल्यामुळें त्यानें निर्वेद प्राप्त करून घेतला होता, असें म्हटलें तरी चालेल. मातीच्या पेल्यांतून उग्रगंधी मोहाचें मद्य घेऊन सुंदरलालनें गळा ओला करून घेतला !

आतां ज्योत्स्नेला जणूं भरती आली होती. वातावरणांत शालवृक्षांच्या फुलांचा सुगंध दरवळून राहिला होता. या प्रदेशांतील लोकांना हा गंध आरोग्याला अनुकूल आहे असें वाटत नाहीं. पण त्या सुगंधांत महुयाची तिक्त मदिरता मिसळून गेलेली होती. म्हणूनच त्या वातावरणामुळें अफूसारख्या विषाक्त नशेनें टाकावी तशी जाणीव झांकळून टाकल्यासारखी झाली होती. कशामुळें तरी पलीकडल्या एका तरुणीच्या आंदोलित देहलतेवर सुंदरलालची नजर खिळून राहिली. त्याची ती नजर जणूं मंत्रमुग्धच झालेली होती !

सुंदरलालला वाटलें, “ किती सर्वांग-सुंदर आहे ही .तरुणी ! आरोग्यानं हिचीं अंगप्रत्यंगं पुष्ट आहेत, सारे अवयव कसे संपूर्ण विकसित झालेले

दिसताहेत, अमर्याद स्वास्थ्यसौंदर्याचा हा प्रदेश. पण या तरुणीसारखं स्वास्थ्यसौंदर्य या प्रदेशांतदेखील विरळच !"

सुंदरलालचे डोळे अतृप्तीनं चमकूं लागले !

" कोण आहे रे ती पोर ?" त्यांनीं विचारलें.

हा प्रश्न ऐकून झड्डू संताळला आपल्या जन्माचें सार्थक झाल्यासारखें वाटलें !

" कोण ? ती पोर का ? ती पोर माझीच—या गरिबाचीच ! बुधनी तिचं नांव !"

अंगरख्याच्या खिशांत हात घालून सुंदरलाल रुपये-पैसे खुळखुळवूं लागला. तो बोलून चालून बैरागी. बैराग्याला सोन्यारुप्याबद्दल, द्रव्याबद्दल अनासक्ति असली पाहिजे. पण सुंदरलालच्या अंगीं ही इतकी अनासक्ति नव्हती. रुपये-पैसे वाजविण्यानें होणारा नाद त्याला भारी आवडे ! तो नाद त्याला अति मधुर गाण्यासारखा वाटे !

" बुधनी ? वाः वाः ! छानच आहे कीं नांव ! बोलाव बघूं तिला इथं !"

बुधनी पुढें आली. तिला थोडेंसें कुतूहल वाटत होतें, थोडेंसें आश्चर्य वाटत होतें; त्यांत भयाचाही अंश नव्हता असें नाहीं. सुंदरलालला हात पाहतां येतो, भुतानें झपाटलेल्यांचें भूत झाडून टाकतां येतें, आणखिन् किती किती तरी करामती येतात कोण जाणे ! अशा माणसासमोर येऊन उभें राहतांना छाती थोडीबहुत धडधडावयाचीच ! बुधनीची छातीही धडधडत होती हें स्वाभाविकच होतें.

कांहीं क्षण सुंदरलालची नजर बुधनीच्या चेहऱ्यावर खिळून राहिली; अंगावरलें कापड नीट ओढून घेऊन तिनें स्वतःला सावरण्याचा प्रयत्न केला.

खिशांतून दोन रुपये काढून सुंदरलालनें म्हटलें, " घे हे रुपये, तुला खाऊसाठीं दिले आहेत ते ! आणि—आणि—"

एका क्षणार्धात हें असें काय झालें ? कदाचित् मोहाच्या मद्याच्या प्रभावानेंही आपला कंठस्वर गाढ व गंभीर झाला असेल असा सुंदरलालला भास झाला ! तो म्हणाला, " बुधनी, तूं या इथं कशाला खितपत राहिली आहेस ? तुला नवरा मोठा भाग्यवान् मिळायचा आहे ! नंगाबाबाचं म्हणणं खरं व्हायचं असेल तर—तर तूं शहरांत गेल्यानंतर तुझ्या नशिबाचं चक्र फिरणार हें तर मला डोळ्यांसमोर प्रत्यक्ष दिसतं आहे !"

सुंदरलाल जणूं दैववाणी बोलून दाखवीत होता. ही वाणी त्याच्या मुखांतून निघत नसून, त्याच्या शरीरांतील इतर कोणी तरी शक्ति हें भाकीत वर्तवीत होती ! मधून मधून सुंदरलालच्या अंगांत देव येत असतो हें संताळांना माहित होतें.

" चल–चल तूं इथून ! जितक्या लौकर शहरांत जाशील, तितक्या लौकर तुझं भाग्य उजळेल ! देवाशपथ सांगतों. तूं निघ इथून–शहरांत जा. तिथं साडया मिळतील, चुडे मिळतील, तेल मिळेल, तुझ्या मनांत असेल तें तें सारं मिळेल ! "

भीतीनें, विस्मयानें, संताळ सरदाराचे डोळे विस्फारित झाले. जणूं ते बाहेर उडया मारणार असें वाटूं लागलें. देवाच्या नांवानें जें जें भाकीत होईल तें तें अक्षरन् अक्षर घडून येणारच ! देवाची नजर वांकडी झाली कीं आटोपलाच सारा कारभार ! जिता जागता माणूस बघतां बघतां मरून जाईल. गांवच्या गांवें बेचिराख होऊन जातील ! भयानें गाळण उडालेले, छाती धडधडणारे सारे संताळ पुढें झाले. त्यांनीं सुंदरलालच्या भोंवतीं ही दाटी केली ! ही संधि साधून आपल्याही नशिबांतलें जाणून घ्यावें एवढाच त्यांचा उद्देश होता.

' शहर—!...साडयां...चुडे...तेलं...अत्तरं ! शहर—म्हणजे स्वप्न-लोकच !...' बुधनी विचार करूं लागली...पण विचार करतां करतां आकस्मिकपणें तिची मति कुंठित झाली !

आतां सुंदरलालच्या अंगांत देव पुरेपूर आला होता याची खात्रीच पटली सर्वांना ! त्यानें म्हाताऱ्या झड्डूला दम्याचें औषध दिलें !

दिगन्त उजळून निर्मल चंद्रप्रकाश निःसीम प्रीतीसारखा व विश्वासासारखा वर्षत होता. जणूं रातराणीच्या असंख्य पाकळ्याच सर्वत्र विखरत होत्या ! शालफुलांचे विषाक्त निःश्वास महुयाच्या सुगंधाच्या भाराखालीं दडपून गेले...सुंदरलालचें भूतानी खेंचर मात्र उगाचच अकारण हालचाल करीत होतें. त्याला कसेंसेंच वाटत असावें—कारण खट् खट् खट् करून आपल्या पायांनीं जमिनीवर पाय आपटीत होतें तें !

भल्या पहांटेस उठून बसण्याची सुंदरलालला संवय होती.

सूर्य उगवून समोरल्या पहाडांना रंगवीत असे; पण त्याआधींच सुंदर-लाल खोलीबाहेर येऊन खाटेवर बसे. त्यानंतर तुलसीरामायणाचें गायन तो सुरू करी.

घटह बढह बिरहिनी दुख दाई
ग्रसह राहु निज सन्धिहि पाई,
कोक शोकप्रद पंकज द्रोही
अवगुण बहुत चन्द्रमा तोहि—

पण सीतेच्या विरहाबद्दल अधिक काळ शोक करीत राहायला वेळ कुठला ? आजकाल संताळांनीं त्याला गुरु मानायला सुरुवात केली होती. साऱ्या कामांत त्यांना सुंदरलालचा सल्ला हवा असे. त्याच्या सल्ल्यावांचून त्यांचें मुळींच चालत नसे.

—पहाडावरून हरिणांचा कळप येतो, आणि शेतांत शिरून चट्टामट्टा करून टाकतो. यावर उपाय कोणता ?

—बडका संताळानें एका संताळ तरुणीला कुंकूं लावलें आहे. पण समजांतल्या नियमाप्रमाणें त्या दोघांचें लग्नच होऊं शकत नाहीं ! यांतून तोड कशी काढायची ?

—अमुक इसमाच्या पायाला जखम झाली आहे. तीन महिने झाले तरी जखम भरून निघत नाहीं.कोणी त्याच्यावर प्रयोग–बियोग तर नाहीं केलेला ?

असे अनेक प्रश्न लोक विचारीत आणि सुंदरलालला त्यांचीं उत्तरें द्यावीं लागत. पण नंगाबाबाचे आशीर्वाद त्याच्या मस्तकीं होते. त्यामुळें सर्वांवर तोडगा निघे. पशुपतिनाथाच्या मंदिरांत जपतप करून मिळविलेली सिद्धि होती त्याच्यापाशीं. तिशी ओलांडण्याआधींच पूर्वजन्मींच्या पुण्याईच्या बळा-वर इहलोकपरलोकची सडक त्यानें पक्की करून घेतली होती !

आज सकाळींच तिलक संताळ येऊन भेटला. म्हणाला, “ स्वामीजी, तुमच्याशीं जरूरीचं काम आहे माझं !”

भांगेची मोठीशी गोळी तोंडांत कोंबल्यानंतर सुंदरलालचें मन प्रसन्न झालें. समोरचें ‘ रामचरितमानस ’ त्यानें बाजूस सारलें व विचारलें, “ बोल, काय हवंय् ?”

तिलक संताळ अगदीं हलक्या स्वरांत म्हणाला, “ तुम्हाला मूठ मारतां येते ?”

" मूठ मारतां येते ! बाण मारतां येतो ! मला हें सारं माहित नसेल तर असेल कोणाला ?" विचित्रपणें हंसत सुंदरलालनें उलट प्रश्न विचारला.

तिलक संताळ हतबुद्धच झाला ! तरी तो म्हणाला, " हो, हो, म्हणूनच म्हणत होतों..."

" काय म्हणत होतास ? एकदां आसामांतल्या चहाच्या मळ्यांत एका सायबाला मारलं होतं ना असंच ! मंत्र तंत्र केलं आणि बाण सोडला ! लेकाचा तीन दिवसांत रक्त ओकायला लागला, रक्त !"

" मेला का अखेर ?"

" मेला म्हणजे काय ? मेलाच अगदीं ! नुसता बाणच काय ? मनांत आणलं तर-तर पिशाच्चदेखील सोडतां येतं मला—कुणाच्याही अंगावर !"

तिलक संताळच्या शरीरावर कांटा उभा राहिला.

मूठ मारायची-बाण मारायचा ! किती भयंकर ! माणसाला जाणीवही नसायची. कोठें तरी जमिनीवर त्याचें चित्र रेखाटलें जातें, त्या चित्राच्या छातीवर तीर मारण्यांत येतो. दिवसभर शेतांत काम करून निश्चिंत मनानें माणूस संध्याकाळीं घरीं येतो, खातो, पितो, तोंच छातींत कळा येऊं लागतात ! नंतर खोकतां खोकतां पुरेवाट होते ! हृदयाचे तुकडे तुकडे होऊन जाणार कीं काय असें वाटूं लागतें. आणि सात दिवसांच्या आंतच आटोपतो सारा कारभार ! आणि पिशाच्च ! ज्याला पिशाच्चसिद्धि लाभलेली आहे, त्याला या जगांत अशक्य, असाध्य असें काय आहे ? या संताळ परगण्यांतील पहाडापहाडांवर किती अशरीरि भुतें छायामूर्तींसारखीं भटकत फिरत असतील, कोणी सांगावें ! संध्येच्या काळ्या आवरणांत शालवनें भयंकर होतात, त्या वेळीं त्या शाल-वृक्षांच्या मोठमोठाल्या पानांच्या सळसळींच्या रूपानें ते प्रेतात्मेच सुस्कारे सोडीत असतात ! ते सुस्कारे ज्यांच्या शरीरांना स्पर्श करतात, त्यांचीं शरीरें मुळें छाटून टाकलेल्या वेलींसारखीं सुकत सुकत जातात. अखेरीस एके दिवशीं जीवनाचा शेवटचा बिंदुदेखील खलास होतो-त्याची हवा होऊन जाते ! ज्या दिवशीं रात्रीं पहाडांच्या माथ्यामाथ्यावर सोसाट्याचा वारा घुदडूं लागतो, मुसळधार पाऊस कोसळूं लागतो, महुयाचीं झाडें उमळून पडतात, रात्रीं विहरणारीं हरिणें देखील जीवाच्या भीतीनें खालीं शेतांत उतरत नाहींत, त्या रात्रीं त्या प्रेतात्म्यांचा उत्सव चालू असतो. त्या वेळीं

जर कोणी माणूस चुकून घराबाहेर आला, तर-तर दुसऱ्या दिवशीं त्याच्या हाडामांसाचा एक तुकडादिखील शोधूनही कोठें सांपडावयाचा नाहीं ! असले हे सारे प्रेतात्मे, हीं सारीं भयंकर पिशाच्चें, या सुंदरलालच्या मुठींत असतात, हुकमतींत असतात,...तिलक संताळ या व असल्या विचारांत गर्क होता, तोंच—

" कुणाला मारायचंय् ! "

सुंदरलालचा हा प्रश्न ऐकतांच तिलक दचकला ! त्यानें पाहिलें, सुंदरलाल हंसत आहे ! त्याचें हंसणें मन प्रसन्न करणारें नाहीं—सारें मन संकुचित, संत्रस्त करणारें आहे !

व्यग्र स्वरांत तिलक म्हणाला, "त्या पल्याडला गांवांत तो डोमन नावाडी आहे. त्याला मारायचं आहे. गेले कित्येक दिवस तो माझ्या मागं लागला आहे. स्वामीजी, सांगितलं तुम्हाला तर खरं वाटायचं नाहीं कदाचित्, पण त्याच्या मंतरतंतरामुळंच, जादूटोण्यामुळंच मागल्या महिन्यांत माझा सोन्या-सारखा मुलगा मेला ! किती तगडा, जवान होता तो, पण कसा बघतां बघतां तळमळत तडफडत मेला–कायमचा हातचा गेला !"

तिलकाच्या डोळ्यांच्या कडा आंसवांनीं ओल्या झाल्या.

" हँ—" सुंदरलाल गंभीर होऊन म्हणाला, " मी तुझं काम फत्ते करून देईन ! त्याच्या मागं पिशाच्चांचा लकडा लावून देईन ! परवां शनिवार. थोडीं फुलं आण. हळद–कुंकू आण. मी तीन चार कवट्या-मुंडकीं जमवून आणतों. त्यांच्याद्वारंच पिशाच्चाची पूजा करायची ! त्या पूजेनं काय होतं–आहे माहित ?"

तिलकनें मानेनेंच " माहित नाहीं " असें सुचविलें.

" सांगतों, ऐक. तुझा तो दुश्मन डोमन रात्रीं झोंपेंत असेल तेव्हां एक प्रचंड काळं काळं पिशाच्च येईल, त्याच्या अंगावर स्वार होऊन बसेल, अन् नंतर तें पिशाच्च नळाची चावी फिरवावी, तसं त्याचं मुंडकं फिरवील ! मोडून टाकील ! मग रक्ताच्या धारा उडतील नि तें रक्त तें पिशाच्च घटाघटा पिऊन टाकील ! त्याचं मांस खाऊन टाकील ! आणि मग—"

बोलणें मध्येंच सोडून सुंदरलाल मोठ्यानें हंसला. त्याच्या बोलण्याच्या त्या शैलीनें सकाळच्या प्रकाशांत देखील तिलकच्या माथ्यावरले केंस भीतीनें

ताठ झाले ! शरीरावर कांटा उभा राहिला ! तें दृश्य मनासमोर आणून तो कल्पना करूं लागला!

“ठरलं तर मग—जा आतां, परवां ये. फुलं आणायला, हळदकुंकू आणायला विसरूं नकोस. आणखी एक राहिलं सांगायचं. त्यानंतर कांहीं दिवस तुला गांवाबाहेर, दुसरीकडे कुठं तरी जाऊन राहावं लागेल. डोमनचं रक्त पिऊन झाल्यावर पिशाच्च आसपास फिरत राहील तुझा शोध करीत. जर का सांपडलास त्याच्या तावडींत तर—तर सद्दी संपलीच म्हणून समज तुझ्या आयुष्याची !”

असह्य भीतीनें तिलकाचें सर्वांग शहारून आलें !

तिलक निघून गेल्यानंतर सुंदरलाल बराच वेळ स्वस्थ बसून राहिला.

समोर ‘ रामचरितमानसा ’ चीं उघडीं पानें फरफर करीत उडून चाललीं होतीं. त्या उडत्या पानांतील धांवणाऱ्या काळ्या काळ्या अक्षरांतून मध्येंच गंधमादनधारी हनुमानाची वीरमूर्ति डोकावून गेली ! गडद रंगानें रंगविलेलें मारुतीचें चित्र होतें तें !

दूर माळावर रेडे चरत होते, त्यांच्या गळ्यांत भलीं जाडजूड लोढणीं होतीं ! साऱ्या वस्तुजातावर सकाळचें सोनेरी ऊन चकाकत होतें !

सुंदरलालचें मन तत्त्वचिंतनांत गढून गेलें...छे, छे: ! हें असें नाहीं चालायचें यापुढें ! दोन महिने—अवघे दोनच महिने उरले ! अशा टुकू टुकू गतीनें चालायला लागलें कीं—कीं हें वर्ष फुकट जायचें !...तिकडे मोसम, सीझन-टाइम संपला कीं या साऱ्या गोष्टींचा उपयोग काय ?...

या अशा विचारांत तो गर्क होता, पण परिचित हंसण्याचा पूर अचानक वाहत आला आणि तो सुंदरलालच्या नुसत्या कानांवरच नव्हे, तर मनावरही प्रबल वेगानें आदळला ! नदीच्या लाटांसारख्या, उसळत्या खिदळत्या यौवनानें मुसमुसलेल्या तरुणींची एक झुंड समोरल्या लाल रस्त्यावर येत होती. दशदिशांत वसंताची विव्हल मदिरता आणि मध्यें या तरुणी म्हणजे पानपात्रें ! हातांतल्या लहान लहान परड्यांत त्यांनीं महुयाचीं फळें वेंचून घेतलीं आणि डोईवरल्या अंबाड्यांत पत्रपल्लवांनीं समृद्ध अशीं नागकेशरचीं फुलें खोवलीं !

सुंदरलाल दिसतांच त्या तरुणी थबकून उभ्या राहिल्या. आपापसांत कांहीं वेळ त्या कुजबुजूं लागल्या. त्यांना सुंदरलालबद्दल भय वाटे. पण त्याबरोबरच त्याच्याभोंवतीं अतीन्द्रिय रहस्याचें जें दाट धुकें होतें, त्या धुक्यांत दडलेलें जग शोधून काढण्यासाठीं त्यांचें कुतूहलपूर्ण मन अधीर होई !

बुधनी विमनस्क होती. ती इकडे तिकडे करीत होती. तिला कांहीं तरी बोलायचें, सांगायचें होतें. अगदीं दीनवाण्या चेहऱ्यानें गळ्यांतल्या माळेचे मणि बोटांनीं तोंडांत धरून ते ती चावूं लागली. तिच्या एका मैत्रिणीनें हलकेच तिला धक्का दिला ! आतांशा बुधनी ही तिच्या मैत्रिणींना गंमतीचा, चेष्टेचा विषय बनून राहिली होती !

सुंदरलालच्या मुद्रेवर, दुसऱ्याच्या चटकन् लक्षांत येईल अशी तीक्ष्णता पसरलेली होती.

"काय ग बुधनी ?" त्यानें विचारलें.

पण बुधनीला अधिक कांहीं विचारावें लागलें नाहीं. जणूं पूराचें पाणी बांध फोडून उसळत्या वेगानें बाहेर पडलें ! तिच्या मैत्रिणी पुनः हंसल्या. हंसण्याच्या झोंक्यावर त्यांचें परिपूर्ण देहसौष्ठव जणूं छन्दोमय झालें, असा भास सुंदरलालला झाला. त्याला वाटलें, "राख बसलेला वासनेचा काळा अग्नि जणूं यांच्या देह-प्रदीपांत फुलून उठलेला आहे !"

"काय ग बुधनी ? अशी इतकी हंसतेसशी आहेस ?" सुंदरलालचे दोन्ही डोळे निर्लज्जपणानें बुधनीच्या सर्वांगाचें विश्लेषण करीत फिरूं लागले ! त्याची ती तीक्ष्ण, शोधक नजर बुधनीचें बाह्य शरीरच नव्हे, तर तिचें मनही न्याहाळीत फिरत होती. ती नजर भोग्याची ? छेः छेः योग्याची !

बुधनीचें उरलें सुरलें साहसही सुंदरलालच्या दुसऱ्या प्रश्नानें एकाएकीं नाहींसें झालें. तिची ती अवस्था पाहून तिच्या सोबतीणींचें हंसणें द्विगुणित झालें ! निमिषार्धांत सौंदर्याची प्रखर विद्युत् प्रभा उधळून त्या तरुणी त्या रस्त्यावरून दक्षिण वायुलहरींसारख्या दिसेनाशा झाल्या.

सुंदरलाल 'आ' वासून त्यांच्याकडे पाहतच राहिला !

आतां फक्त दोनच महिन्यांचा अवधि उरला. दोनच महिने ! पण दोन दिवस जर का उशीर झाला, तर-तर किती नुकसान होईल ? चहाच्या मळ्यांत किती तरी तरुणी आहेत. पण बुधनीच्या तोडीची एकही नाहीं !

सुंदरलालच्या दोन्ही डोळ्यांत जणूं साप डोकावूं लागले ! तो मनाशींच म्हणाला, " साहेबांना भल्या माणसाची कदर आहे ! दोन दिवस उशीर झाला तरी–तरी ते कांहीं बोलायचे नाहींत ! "

आध्यात्मक दृष्ट्या सुंदरलाल बराच पुढें गेलेला होता यांत शंका कसली ?

संन्यासी मनुष्य ! घर सोडून कधींच बाहेर पडलेला ! विषय–वासनेचें प्रलोभन त्याला नाहीं. या जगांत परोपकाराखेरीज त्याला दुसरें कांहीं माहित नाहीं ! संताळांची समजूत अशीच होती. झडू :संताळाला असेंच वाटत होतें. बुधनीला त्याबद्दल संशय देखील नव्हता. सुंदरलालच्या मुखाकडे पाहतांनाही तिलक संताळाच्या अंगावर कांटा उभा राही !

पण पशुपतिनाथाच्या मंदिरांत मिळविलेला तो सिद्ध मंत्र ! त्या मंत्रामुळें जगांत असाध्य असें काय होतें ? सुंदरलालला रुपये–पैसे तयार करतां येत याबद्दल तर कोणालाही शंका नव्हती !

एकाद्याला गरज पडली तर...तर सुंदरलाल, त्यानें न मागतांच, त्याच्याकडे जाई; कोरे चकचकीत, नवे रुपये खिशांतून बाहेर काढी आणि त्याच्या हातांत देई ! इतर कोणत्याही कारणापेक्षां या कारणानेंच संताळ प्रभावित झाले होते. आपली अक्कल त्यांनीं सुंदरलालपाशीं अशी विकून टाकली होती. त्यांना वाटे, सुंदरलालनें मनांत आणलें तर–तर तो दगडांचें सोनेंही करून सोडील ! सोन्याचे ढीगच्या ढीग उभे करील ! असल्या या चमत्काराबद्दल कोणी विचारलेंच, तर सुंदरलाल उत्तर देत नसे. फक्त हंसे ! गूढपणानें, रहस्यमय भावनेनें हंसे !

असेच आणखी कांहीं दिवस लोटले.

बिली संताळणीला कसली तरी भूतबाधा झाली होती. शालवनाच्या मध्यभागीं शेंदूर फांसलेला एक मोठाला काळा फत्तर होता. संताळांचा तो शिंगबोंगा ! त्याची पूजा होती, देवाला कोंबड्यांचा आणि मोहाच्या मद्याचा नैवेद्य !

सुंदरलाल आपल्या खेंचरावर आरूढ होऊन तेथें हजर झाला.

त्या वेळीं बळी देण्याचें काम संपलेलें होतें. फत्तराच्या चोंहों बाजूंस छिन्नकंठ कोंबड्यांच्या रक्ताचा सडा पडला होता. शालफुलांच्या वासानें वातावरण कसें जड झालें होतें–सुस्कारे सोडणेंही त्रासदायक होत होतें.

ढोल वाजत होते. त्याबरोबरच नाचही चाललेला होता. पण हा नाच ज्योत्स्ना रात्रीच्या महुवा–मदिर असंयत नाचासारखा नव्हता ! तो नाच आपल्या रक्तकणांत तरल नशा दाटविणारा; अन् हा नाच जणूं मनावर एक प्रकारची अस्वस्थता पसरविणारा ! पहाडाच्या कुशीला बिलगून घनदाट शालवन लांबच लांब पसरलेलें होतें. शालवृक्षांच्या मोठमोठाल्या पानांच्या थराथरांनीं सूर्यप्रकाश अडवून धरून एकापरीनें अंधकारलोकच बनविलेला होता. या निवांत–निभृत जगांत अशरीरि शिंगबोंगा कोणत्याही क्षणीं आपल्या अनुयायांसह सशरीरि होऊन उठला असता !

सुंदरलाल येतांच मद्यपात्र समोर आलें. आकंठ मद्य ढोसल्यानंतर सुंदरलाल प्रसन्न झाला. शिंग–बोंग्याच्या काळ्या पत्थराच्या अंगावर रक्ताचा व शेंदराचा लेप चढलेला होता. त्यावर एकदम नजर गेली कीं, एकाद्याचा जबडा पसरल्याचा भास होई,—त्यानें जणूं खरोखरच रक्त प्यालेलें आहे, आणखी रक्त पिण्यासाठीं तहानेल्या डोळ्यांनीं तो टक लावून पाहत आहे, असा भास होई.

मध्येंच सुंदरलाल उभा राहिला. आपल्या आरक्त स्थिर नजरेनें त्यानें एकवार सर्वांकडे पाहिलें. नंतर अंगांत आल्यागत पाय नाचवीत तो घुमूं लागला. थेट त्या पत्तरासमोर जाऊन, त्यानें धाडकन् त्यावर अंग टाकलें ! पायांतील चढावांच्या लोखंडी नालांचा आणि अंगरख्याच्या खिशांतील रुपयांचा आवाज एकाच वेळीं झाला !

जरा वेळानंतर तो पुन्हां उठून उभा राहिला. त्याच्या अंगरख्यावर मातीचे डाग होते. कांहीं वेळापूर्वीच त्यानें पान खाल्लें होतें. त्याचा लालभडक मुखरस तोंडाच्या दोहों बाजूस बीभत्सपणानें पसरलेला होता. तेथें असलेल्या सर्वांवर त्यानें पुनः एकवार आपली तीक्ष्ण नजर फिरविली आणि एकाएकीं तांडवनृत्य सुरू केलें !

ढोल अधिकच उत्साहानें वाजूं लागले. नगारे, टिमक्या वाजूं लागल्या. सुंदरलालच्या अंगांत आला होता शिंग–बोंगा ! जमलेल्या संताळांच्या मनावर भयाची आणि आनंदाची एक संमिश्र विचित्र अनुभूति पसरली !

सुंदरलाल हालत, डुलत, घुमत नाचूं लागला. कोंबड्यांचें रक्त त्यानें आपल्या हातावर, आपल्या चेहऱ्यावर माखून घेतलें होतें. पाहणाऱ्याला

जणूं पिशाच्चच नाचत आहे असा भास झाला असता! पायांतील कच्च्या चामडयाचे चढाव त्यानें दूर भिरकावून दिले आणि त्याच्या पायांच्या तालाला त्याच्या खिशांतील रुपयांच्या आवाजाची सांथ मिळूं लागली!

—आणि असें नाचतां नाचतांच सुंदरलाल अवचित थांबला!

त्याचे तारवटलेले डोळे जणूं रक्त प्याल्यासारखे भासत होते. त्याच्या आवाजांत दैववाणीचा सूर भासत होता, " झड्ड संताळ, ऐकलंस का झड्ड संताळ! मी आहें शिंग–बोंगा! तुम्हाला हांक देतों आहें, ऐका–ऐका होऽऽऽऐकाऽऽ!"

ढोल–नगारे आणखी जोरानें वाजूं लागले. त्यांच्या आवाजानें वन, आकाश दुमदुमून गेलें. संताळांनीं साष्टांग नमस्कार घातले. झड्ड संताळानें कांपऱ्या आवाजांत विचारलें, " देवा, काय हुकुम आहे ?"

" माझं सांगणं ऐका! तुमच्या गांवांत पटकीची सांथ पसरणार–पटकीची सांथ! त्या सांथींतून कोणीही सुटायचा नाहीं, कोणीही जगायचा नाहीं. सारे मातींत मिसळून जातील! करम देवता आतां कोपली आहे! तिचा तुम्हां सर्वांच्यावर राग आहे. ती कोणाला सोडायची नाहीं–कोणाला म्हणजे कोणालाच!"

सारे दचकले, थरथर कांपूं लागले! ढोल–नगारे थांबले. शालफुलांच्या गंधानें वाऱ्याची गति जणूं स्तब्ध होऊन राहिली होती!

संताळांत हाहाकार उडाला! संताळणींच्या तोंडून भयातुर आर्त नाद निघूं लागले, ' शिंग–देवा, बोंगा देवा! आम्हां सर्वांची राखण करा! आम्ही गरीब. आम्ही दुबळे. आम्ही चुकलों–आम्हांला वाट दाखवा! तुमचा कोप झाला. आतां उपाय सुचवा–इलाज सुचवा!" सर्वांच्या तोंडून एकच विनवणी बाहेर पडली!

सुंदरलालच्या कंठांतील देववाणीचा सूर अधिकच भयंकर झाला! तुफान येण्याआधीं कोसळूं पाहणाऱ्या काळ्या काळ्या मेघांनीं झांकळून टाकलेल्या ईशान्य दिशेसारखा त्याचा चेहरा काळवंडून गेला होता.

" इलाज आहे. नंगाबाबाच्या या शिष्याची, सुंदरलालची, कांस धरा! तो तुमचा पुढारी—तो तुम्हाला वाट दाखवील. त्याच्या सोबत तुम्ही

उत्तरेकडे चला ! तिथं तुम्हाला घर मिळेल, जमीन मिळेल, नाना तऱ्हेचीं सुखं मिळतील !"

झड्डू संताळनें नापसंतीचा क्षीण मुद्दा पुढें करीत म्हटलें, "पण बाबा, घर-दार सारं सोडून देऊन–"

"घर–दार ! घर–दार !" वेड्यावांकड्या भुंवयांनीं सुंदरलालचें रक्तानें माखलेलें कुटिल मुख भुतासारखें दिसूं लागलें ! तो दांतओंठ खात बोलूं लागला, "घर-दार, घर-दार करीत राहाल, घरांदारांस कवटाळून राहाल, तर मरून जाल त्या घरादारांच्या मगरमिठींत ! करम बाबा तुमच्यापैकीं कोणाला सोडीलसं, सुखानं राहूं देईलसं वाटतं तुम्हाला ! पण तें खोटं आहे–साफ खोटं आहे ! तो हाडमांस चावून चावून खाईल हें पक्कं ध्यानांत ठेवा. कुत्र्या-मांजरासारखे मरून जाल तुम्ही !"

या वेळीं सुंदरलालचे दोन्ही डोळे रक्तानें लाल लाल झाले होते. त्याच्या त्या डोळ्यांत संताळांना जणूं भावी महामारीचें प्रतिबिंब दिसूं लागलें !

वनवास सोडून सुंदरलालला पुनः संसाराकडे वळावेंच लागलें. इलाजच नव्हता. 'करम' देवतेच्या कोपापासून या साध्याभोळ्या, भोळ्याभाबड्या संताळांचें रक्षण आपणच केलें पाहिजे. विपन्न लोकांचा उद्धार केला नाहीं, तर संन्यासाचा काय उपयोग ?

सकाळच्या प्रकाशांत संताळ परगण्यांतील वनश्रीचें सौंदर्य अधिक खुललें. पहाडांपहाडांवर वसंत जणूं उल्हासानें तरंगत होता. लहान लहान गुलाबजामसारखीं शुभ्र मोहाचीं फुलें तिक्त मधुर रसानें परिपूर्ण होऊन टप् टप्, टप् टप् गळून पडत होतीं. फांद्याफांद्यांवर हिरव्या रंगाची डूब दिलेल्या पाखरांचा नाच चालू होता आणि पारव्याची करुण हांक ऐकूं येत होती.

गळ्यांत गांठोडें बांधलेलें सुंदरलालचें भूतानी खेंचर टुक टुक करीत पुढें पुढें चाललें होतें. मागून ढोल वाजत होते. एका अस्फुट गाण्याचें गुंजन ऐकूं येत होतें. घर सुटल्याचें दुःख विसरण्यासाठींच कीं काय संताळ पुरुषांनीं बांसऱ्या वाजविण्यास सुरुवात केली होती. स्त्रियांच्या चेहऱ्यावर क्षोभाचीं लक्षणें मुळींच दिसत नव्हतीं. वाट चालायच्या आनंदांतच त्या खूष होत्या. ढोलाच्या आवाजाचा ताल देत देत त्यांच्या काळ्या-

भोर केसांवरल्या शुभ्र फुलांच्या मंजिऱ्या डोलत होत्या. बुधनीच्या डोळ्यां-वर स्वप्न तरंगत होतें, “शहर...कांकणं...तेलं...आणि घर! देवाची आज्ञा मिळाली आहे मला–हो! मला!”...

...आसामांतील चहाच्या मळ्यांत कामें करण्यासाठीं मजूर मिळण्याचें काम किती बिकट, किती असंभाव्य हें साहेबांना माहित आहे. काळ्या ज्वरानें लोकांच्या झुंडीच्या झुंडी मरताहेत, आसपासच्या गांवांतून एक मजूरही आणणें अशक्य होऊन बसलें आहे.! बुधनीचा हिशेब निराळा...! बुधनीला वगळलें–सुंदरलाल मनाशींच हिशेब करूं लागला,–बुधनीला वगळलें कीं बेचाळीस जण मजूर उरतात. प्रत्येक मजुरामागें कमिशन! किती बरें येईल कमिशन?

संताळ परगण्यांतील विमुक्त निसर्गाला वसंताच्या उदार आनंदधारा न्हाऊं घालीत होत्या! पहांटेचा वारा लागून, पहाडी वाटेवर, कृष्णचूडाच्या रंगीत पाकळ्या झरझर करीत पडूं लागल्या होत्या.

## फुटका चष्मा

जिल्ह्याच्या शहरांत स्कूल–मास्तरी. पगार महिन्याकाठीं रुपये साठ. अन् शिवाय वीस वीस रुपयांच्या दोन शिकवण्या! एकूण मासिक उत्पन्न रुपये शंभर! फर्स्ट क्लास एम्. ए. च्या जीवनांतील आर्थिक परिणतीचें हें शिखर, महत्त्वाकांक्षेची परिसीमा!

कंट्रोल आणि काळा बाजार आणि इन्फ्लेशन! रेशन कार्डाच्या अवरुद्ध अंजलींतून थेंबाथेंबानें जें गळून पडतें त्यानें ओंठ देखील भिजत नाहींत! अनुराधेचें मुख आषाढाच्या मेघासारखें काळवंडलेलें. बाहेरचा वादळी वारा, पाऊस एकादे वेळीं सहन करतां येतो; पण घरांत प्रेयसीचा अप्रसन्न चेहरा पाहिला कीं वानप्रस्थाश्रम घ्यावा असें वाटूं लागतें! 'का तव कांता?' असें म्हणून एक दिवस हरिद्वारची यात्रा करण्यासाठीं वाट चालूं लागायचें असें कितीदां तरी मनाशीं ठरविलें, पण दार्जिलिंग मे ल चालली कीं वैराग्याची अवस्था नाहींशी होई, निर्वेदाची अवस्था येई. संन्यास घेणें कठीण नाहीं; पण ट्रेनमधून पडून अपघाती मृत्यु येणें मात्र कांहीं इष्ट नाहीं!

आम्ही शाळामास्तर–भावी युगाचे देशनेते, समाजनेते; कदाचित् आमच्या मंत्रवाणीनें बुद्ध–चैतन्यासारखे महात्मेदेखील लहानाचे मोठे होत असतील! आमच्यासारख्या ज्ञानतपस्वी आचार्यांनीं चिंचेचें सार पिऊनच आनंदी राहायला हवें! पण मानसिक शांतीच्या त्या पायरीवर चढतां येत नाहीं असें अनुभवानें आढळून आलें मला. महाराजा कृष्णचंद्र आमच्यासारख्या शिक्षकांच्या अडीअडचणी समजून घेण्यासाठीं शिक्षकांच्या घरीं येत असें सांगतात. त्यांच्याप्रमाणें लॉर्ड वेव्हल आमचीं गाऱ्हाणीं समजून घेण्यासाठीं पंधरा रुपये भाड्याच्या आमच्या या पत्र्याच्या चाळींत पदार्पण करतील, इतकें आशावादी बनणें कठीण आहे! म्हणून इकडे तिकडे बिलकुल लक्ष न देतां खूप मोठी उडी घेतली. युद्धाचा बाजार म्हणजे स्पेक्युलेशन. म्हणून—

म्हणून टिकून राहिलों, तर डेप्युटी मॅजिस्ट्रेट, नाहीं तर पुनः आहेच मास्तरकी !

ही उडी कशी, केव्हां, कोठें घेतली तेंच खुलासेवार सांगायचेंय् !

शहरांतले एक सद्गृहस्थ निधन पावले होते, म्हणून पहिल्या तासानंतरच शाळेला सुटी देण्यांत आली. आपल्याला वाटणारें दुःख व्यक्त करण्यासाठीं कांहीं मुलें ताबडतोब पेरूच्या झाडांकडे धांवलीं, कांहीं क्रीडांगणावर गेलीं आणि तिथें क्रिकेटचा खेळ खेळूं लागलीं. कांहींनीं जवळपास ट्रिप काढण्याचा बेत ठरविला. आम्हीं पडलों शिक्षक. टीचर्स रूममध्यें बसून फुटाणे खात खात आणि सिगारेट पीत पीत चालू युद्ध लौकर कसें संपवितां येईल याची तांतडीची योजना करण्यांत गढून गेलों !

अंमळशानें हेडमास्तरसाहेब तेथें येऊन थडकले ! स्वारी कट्टर वैष्णव. गळ्यांत जपमाळ. सेक्रेटरीसाहेबांच्या घरीं टाळमृदंग वाजवीत भजन करण्यांत स्वारीला स्वर्गसुख वाटायचें. मुलांना छड्या मारायच्या आधीं भला मोठा सुस्कारा सोडून स्वारी म्हणे, " भगवान् कृष्णाची सृष्टि—त्याचीच इच्छा ! मुलांना मारायचा प्रसंग नको वाटतो ! पण करणार काय ? हरीची इच्छा !" त्यांच्या वेताच्या छडीला तुळशीपत्र बांधलेलें असे !

हेडमास्तरसाहेब टीचर्स रूममध्यें आले ते हातांत एक छापील पत्रक घेऊनच. आम्हां सर्वांना उद्देशून ते म्हणाले, " तुमच्यासाठीं एक शुभवर्तमान आहे. पाहा. कृष्णाची इच्छा ! कुणी चान्स घेतलात तर कल्याण होईल जन्माचं !"

शब्द कानांवर पडायचा अवकाश, आम्ही जर्मनीला तसेच सोडून देऊन, त्या पत्रकावर एकसमयावच्छेदें तुटून पडलों ! खरेंच, आनंदानें वेड लागावें अशीच बातमी होती त्या पत्रकांत. गांवागांवांत रिलीफ वर्कसाठीं सब डेप्युटी ग्रेडचीं कांहीं माणसें नेमायचीं आहेत; शिक्षकांना सर्वांत आधीं व सर्वांत जास्त पसंत करण्यांत येईल; नोकरी टेंपररीच; जर कोणाची इच्छा असेल तर त्यांनीं हेडमास्तरांची परवानगी घेऊन...

एकूण शाळामास्तरांचें भाग्यही उदयाला आलें म्हणायचें ! अस्मादिकांनीं ताबडतोब चालून आलेल्या संधीचा फायदा घ्यावयाचें ठरवलें. शेजारच्या वकील मित्राकडून एक कोट आणि एक पॅंट उसनी घेतली, ते

कपडे कसेबसे अंगावर चढवले आणि इंटरव्ह्यू देऊन आलों ! तुम्हाला खरें नाहीं वाटायचें कदाचित्–पण घडलें खरें. मला नोकरी मिळाली ! कालीमातेला सव्वा रुपयाचा नैवेद्य मिळाला ! आणि माझी अनु–लौकरच आपण एका अधिकाऱ्याची पत्नी होणार अशा प्रकारचीं मधुमय स्वप्नें बघूं लागली ! आधींच सुधारकी कुटुंबांतली; त्यांत ग्रॅज्युएट ! शाळा–मास्तरची बायको झाल्याबद्दल रोज तिचें शिक्षण तिला दूषण देऊं लागलें होतें, धिक्कार करूं लागलें होतें. मीं मनाशीं विचार केला, नोकरी टेंपररी आहे ना ? असूं द्या ! दोन दिवसांची अबू हुसेनची नबाबी आहे खरी; पण घेऊं झालें तिचा उपभोग. निदान अनूचा चेहरामोहरा तरी खुलेल कांहीं दिवस...

हेडमास्तर म्हणाले, “ कॉंग्रॅच्युलेशन्स ! या जाऊन–कृष्णाची कृपा असेल तर उन्नति होईल तुमची ! अन् तुमच्या सारख्या तरतरीत तरुणाला–”

मी मध्येंच म्हणालों, “ हो, सारी कृष्णाचीच कृपा !”

पण अधिकारी बनायची इच्छा असली म्हणून कांहीं अधिकारी होतां येत नाहीं याचा अनुभव मला थोड्याच दिवसांत आला, तो मर्मामर्मांत ठसला. महिन्यांतून वीस वीस दिवस दौऱ्यावर जायचें ! सायकलवर टांग टाकून मैल न् मैल भटकायचें ! दुष्काळ आणि मलेरिया यांनीं ग्रासून गेलेलीं खेडीं-पाडीं अंडरपॅंटची क्रीज आणि हॅटचा उद्धटपणा पाहून दचकत. पावलों-पावलीं सलाम मिळे. लोकांच्या झुंडीच्या झुंडी मदत मागण्यासाठीं डाक-बंगल्यासमोर येऊन गर्दी करीत. अंमलदारीचा अंमल नवाच चढत होता. तो अंमल ताजें रक्त प्यालेल्या वाघासारखा मनाला मत्त करी ! मनांत येई, खरें जगणें तें हें ! पहिल्या वर्गात एम्. ए. पास झालों खरा, पण त्याचें हें बक्षिस इतक्या वर्षांनीं, आतां वसूल करतों आहें. “ आपण आमचे मालक, आमचे माय, बाप, या आख्ख्या जिल्ह्याचे अंमलदार–” लोकांचे हे शब्द ऐकून मनांत किती अभिमान वाटे ! कसोटीच्या परीक्षांचे मार्क समजून घेण्यासाठीं विद्यार्थ्यांच्या झुंडीच्या झुंडी माझ्या दाराशीं येत, त्या वेळीं मन अभिमानानें फुलून येई–पण कुठें तो आनंद नि कुठें हा !

औषधें, कांबळीं आणि ‘ रेशन ’ निराधार लोकांना वांटण्याचें काम चाललें होतें. आणि मी होतों त्याचा अधिकारी ! सरकारी दाक्षिण्य जणूं मुक्तधारेसारखें उतून चाललें होतें एकदम ! सकाळपासून संध्याकाळपर्यंतचा

वेळ अविश्रांत कामाच्या दडपणाखालीं निघून जाई. तरीही मधून मधून मन क्लांत होई, संशयग्रत होई. वाटे, स्मशानावर अनुग्रहाचा वर्षाव करण्यांत काय फायदा आहे ? काय अर्थ आहे ?

—स्मशान ? हो, स्मशानच नाहीं तर काय ? दुष्काळ आला–आणि आतां निघून गेला. पण उभें राहिलें दुसरेंच संकट ! आतां आला मलेरिया. शीतकालच्या संध्याकाळीं जंगलावनांतून बिशाक्त आणि श्वास रोधून टाकणारा अंधकार येई आणि जणू साऱ्या पृथ्वीला वेढून टाकी ! संध्याकाळ व्हायचा अवकाश कीं डांसांचे थवेच्या थवे येत आणि आपलें गाणें अखंड चालू ठेवीत ! त्यामुळें संध्याकाळपासूनच मी मच्छरदाणीचा आसरा घेई. त्या दिवशीं असाच मच्छरदाणींत बसलों होतों. दूरचीं शेतें किती भकास दिसत होतीं. चंद्राचा धूसर प्रकाश त्यांवर पसरलेला होता. त्यामुळें तीं अधिकच विषण्ण, पांडुर झालीं होतीं. दूर कोठें तरी कोल्ह्याचें ओरडणें ऐकूं येत होतें, घुबडाचा आर्त नाद मधूनच वाहणाऱ्या वाऱ्याबरोबर ऐकूं येई. पण माणसाचा आवाज मुळींच ऐकूं येत नसे. मुलांच्या रडण्याचा आवाजही कानीं येत नसे ! मलेरियाच्या व दुष्काळाच्या तडाख्यांत माणसें उंदरासारखीं चिंव चिंव करून मेलीं ! जीव जगविण्यापुरतेंही अन्न न मिळाल्यामुळें खंगलेल्या आयांचे शुष्क स्तन तोंडांत धरीत, त्यांतून दूध न मिळाल्यामुळें तडफडत, तडफडत लहान लहान मुलें आईच्या कुशींत मरून गेलीं. भावी स्वतंत्र भारताची एक उगवती पिढी या अभिशापानें खतम् होऊन गेली होती !

या साऱ्या विचारांच्या दुबळ्या क्षणीं शाळामास्तराचें साधेभोळें, कोणाला कधीं न दुखवणारें जीवन बेचैन होई. मस्तक भणाणून जाई ! एक मोठें प्रहसन चाललेलें आहे आणि आपण त्यांत विदूषक आहों असें वाटे ! जे मेले, त्यांच्या मृत्यूला जबाबदार कोण ? त्यांना जगवतां आलें नसतें का ? आणि आतां जे मेले–हजारों लोक मेले–त्यांच्या कबरांवर 'रिलीफ'च्या सांत्वनाचा सडा शिंपणें म्हणजे त्यांचा अपमान करणेंच नव्हे काय ? याची तरी काय जरूर होती ? काय जरूर आहे ? किती तरी जीव आज मरायला बसले आहेत. त्यांना शांतपणानें मरूं तरी द्या ! नदीकिनारीं ज्यांच्या नग्न करवंट्यासाठीं कोल्हेकुत्रे आपापसांत झगडत आहेत. त्यांच्या त्या सांगाड्याच्या मुखावर आमचें हें दाक्षिण्य पाहून आनंदाचें हसूं दिसायचें आहे काय ? त्यांच्या डोळ्यांत आग

असती, तर हा वेळपर्यंत त्या अग्निज्वाळांनीं आम्ही केव्हांच भस्म होऊन गेलों असतों !...

पण या साऱ्या गोष्टींचा विचार करून तरी काय उपयोग ? बोलून चालून ही नोकरी राजीखुषीनें पत्करलेली. ही नोकरी म्हणजे अबू हुसेनची राजगादी ! तिचें आयुष्य तीन महिने का सहा महिने, कोण जाणें ! पण कांहीं झालें तरी ही अंमलदारीच !

हृदय प्रामाणिक हा माझा ऑर्डर्ली. तो जेवण घेऊन येई. मच्छरदाणींत बसल्याबसल्याच मी त्या जेवणाचा समाचार घेई. आणि नंतर डाकबंगल्यांतील पट्ट्यांच्या खाटेवर, ऊबदार पांघरूणांत, मी माझें शरीर पसरून देई. आलस्यमंथर तंद्री मला आलिंगन देई. थंडी तरी किती ! झोंपेत स्वप्नें पडत. यांत माझ्या अनूचा चेहरा दिसे आणि बघतां बघतां नाहींसा होई ! मग मला अर्धवट जाग येई. थंडीची तीव्रता बोंचे. वाटे, बाहेरच्या शीतार्त दशदिशा जणूं मृत्यूच्या मिठींत थरथर कांपत आहेत...

असेच दिवस चालले होते. दुःखांत...सुखांत. पगाराखेरीज चिरीमिरीही मिळायची ! मधून मधून शाळामास्तरी विवेक जागा होई, चाबूक मारूं पाही,...पहिल्या-पहिल्यांदा असें अनेकदां झालें. पण आतां–आतां सारें सहज झालें आहे ! अंगवळणीं पडून गेलें आहे ! सारें यंत्रवत, एकाच सूत्रांत हालणारें, वाजणारें ! विवेकाच्या टोंचणीनें जो मूर्ख बेसूर गाऊं लागतो, त्याला तीन दिवसांत कानपिचक्या मिळतात—आणि मूळ स्वरासारखाच सूर काढावा लागतो ! असा आहे हा जगाचा व्यवहार ! मनांत म्हणें, सारी कृष्णाची इच्छा !

त्या दिवशीं चहापान झाल्यावर डाकबंगल्याच्या व्हरांड्यांत येऊन बसलों होतों. हिंवाळ्यांतलीं उन्हें मधुर ऊब घेऊन सर्वांगावर पहुडलीं होतीं. सिगारेटचा धूर हवेंत सोडीत बसलों होतों. मोठी मजा वाटत होती. दोन महिन्यांपूर्वी नेमका याच वेळीं मी विद्यार्थ्यांशीं झुंज खेळत बसत असें. विद्यार्थ्यांचा निर्बुद्धपणा पाहून त्यांच्या त्या पोकळ टाळक्यांत नेस्फिल्ड मारावा आणि चालतें व्हावें असें वाटे ! पण महिनाअखेरीस वीस रुपये मिळत; सबब चूप बसत असें !

आणि आज ! त्या वेळची माझी स्थिति आणि आतांची स्थिति आकाश-पाताळाचें अंतर ! अखेर जिंकलीच ! जीवनाचें चक्र उलट्या गतीनें फिरण्यास सुरुवात झाली आहे. मला ' कोरस ' गातां आला, तर हल्लींची नोकरी कायम होण्याचीही शक्यता आहे अशी आशा वरिष्ठांनीं त्या दिवशीं दाखविली होती. तसें झालें तर—दुष्काळाचा जय असो ! दुष्काळ पडला, मागून रिलीफचें काम सुरू झालें म्हणून तर मिळाली ही नोकरी ! रोगराई नसेल तर कांहीं कांहीं पशुपक्षांना मेजवानी मिळत नसते !

डाकबंगल्याच्या खालीं लोकांची ही गर्दी जमली होती ! हृदय प्रामाणिक वहींत नांव गांव लिहून घेत होता आणि रामदुलार निराधार लोकांना कांबळीं वांटीत होता. तीं माणसें असून नसल्यासारखीं होतीं. फाटक्या चिंध्या झालेल्या लक्तरांआड अस्थिपंजर झालेलीं गतकालांतील माणसें थरथर कांपत होतीं ! खांद्यापर्यंत पडणाऱ्या वाढलेल्या जटा, चेहऱ्यावर अस्ताव्यस्त दाढी, डोळ्यांतल्या नजरेंत घांसलेल्या कांचेसारखी अर्थहीन शून्यता !

...सहज माझी नजर हृदय प्रामाणिकवर पडली आणि लागलीच आतां-पर्यंतचा सारा आराम नाहींसा झाला.

...एकोणीस—वीस वर्षांची एक तरुणी उभी होती.

आतांपर्यंत दलाल तिला उचलून घेऊन कसे गेले नाहींत याचेंच आश्चर्य वाटत होतें ! उपास तापास घडलेले असून देखील तिची यौवनश्री अजून प्रकट होत होती. आणि शंभर ठिगळें जोडलेल्या फाटक्या साडींतूनही तिचें तें यौवन असाहाय्य करुणतेनें स्वतःला प्रकाशांत आणीत होतें ! आणि तिच्या त्या यौवनाकडे हृदय प्रामाणिकची कामांध नजर लागून राहिली होती ! तो वहींत नावें लिहीत होता खरा, पण त्याची नजर—मेल्या जनावरावर गिधाडाची तीक्ष्ण व निर्लज्ज नजर पडावी तशी ती होती !

संतापानें माझ्या तळव्याची आग मस्तकाला जाऊन पोंचली ! मीं चढ्या स्वरांतच म्हटलें, " हृदय !"

हृदय जणूं तटस्थ होऊन उठून जवळ आला !

" काय साहेब ?"

" कोण आहे ती पोर ?

हृदय चपापला. त्यानें संशयानें आणि संकोचून एकवार माझ्याकडे पाहिलें. नंतर ओंठ आवळून तो म्हणाला, " बाबूसाहेब, ती आहे कमलपूरची."

" ठीक आहे. तिला कांबळं देऊन टाक आणि आत्तांच्या आत्तां तिला रवाना कर. समजलं ?"

" हां, बाबू. " मान हलवीत हृदयनें विनयपूर्वक उत्तर दिलें व तो पुनः आपल्या कामांत गढून गेला. मनांतल्या मनांत तो मला अवाच्य शब्दांनीं लाखोली वाहत असावा, हें मीं ओळखलें. पण शाळामास्तरी मनावर मला अद्यापिही विजय मिळवितां आलेला नव्हता. हा सारा क्षुद्रपणा, नीचपणा पाहून तें मन आपोआप खवळून उठे.

सकाळचें सोनेरी ऊन माझ्या मनाला आतां कसेंसेंच वाटूं लागलें. हृदय प्रामाणिकच्या नजरेंत दिसलेली ती भूक, ती आग, आपणा सर्वांच्याच नजरेंत नसते का ? एकादा माणूस अडीअडचणींत, आपत्तींत सांपडलेला असला म्हणजे आपण त्याला स्वार्थाखातर पिळून काढीत नाहीं का ? साठ रुपये पगाराच्या मास्तरकीपासून तों आजच्या या हुद्द्याच्या राजतक्तापर्यंतच हा सारा रस्ता–कोणी कसा बनवलाय् हा ? क्षणभर वाटलें, यापेक्षां ती मास्तरकी गरिबीची असली तरी किती चांगली होती ! निदान त्या वेळीं असलीं—

" नमस्कार, सर ! "

माझी विचारशृंखला खळकन् तुटली.

समोरच एक सद्गृहस्थ–किंवा भूतपूर्व सद्गृहस्थ म्हणणेंच अधिक बिनचूक ठरेल–उभे होते. त्यांच्या अंगावर एक मळकटलेला, घाणेरडा, दोन्ही खांद्यांवर फाटलेला असा सदरा होता. तो जणूं त्यांच्या हडकुळ्या शरीराला चिकटूनच बसलेला दिसत होता ! धोतर तसेंच मळकट; त्यांच्या पायांत लाल कॅनव्हसचे बूट होते. बुटांना बंद नव्हते. दोन्ही पायांचीं तीन चार बोटें त्यांतून बाहेर डोकावत होतीं. त्यांची काळीपांढरी अस्ताव्यस्त वाढलेली दाढी छातीपर्यंत येऊन पोंचलेली होती. आणि त्यांच्या डोळ्यांवर होता एक फुटका चष्मा !

मला नकळतच माझें मन संकुचित झालें. दुःखाची तीच ती चिरंतर यादी आतां ऐकावी लागणार ! बायकापोरांचे हाल, धान्याचे वाढलेले दर,

खेडयापाडयांना भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा आणि अखेर इत्यादींतून अधिक प्रमाणांत मदत मिळावी अशी काकुळतीची विनंती !

मीं म्हटलें," हं बोला, काय हवंय् ?"

पण या स्वारीनें माझा तर्क अगदींच चुकीचा ठरविला ! त्यांनीं अभिमानानें म्हटलें, " मी इथल्या शाळेचा हेडमास्तर. एका बाबतींत सल्ला हवा आहे आपला."

मीं म्हटलें, "बसा तर खरे–"

जोरांत मान हलवीत स्वारी उद्गारली, "छे छे, मुळींच बसणार नाहीं मी ! आम्ही बोलून चालून शाळामास्तर, आणि आपण अंमलदार–आपल्यासमोर खुर्चीवर कसं बसायचं आम्हीं ? आपल्याला विचारायचं होतं तें हें कीं, प्रेपोझिशन्स ( Prepositions ) शिकल्याखेरीज कधीं इंग्रजी येतं का ?"

आतां मात्र मीं संशयानेंच त्या स्वारीकडे पाहिलें...अरे हो, स्वारीचा मेंदू ठिकाणावर दिसत नाहीं ! त्यांचे मंद डोळे लालसर दिसत होते. आपल्या भ्रमिष्ट नजरेनें ते जणूं माझ्याकडे न पाहतां माझ्या शरीरांतून माझ्या पाठीमागच्या भिंतीकडे पाहत असावे ! काळसर, विवर्ण, ओंठाच्या दोहों टोंकास लाळीचे सुकलेले डाग दिसत होते. त्यावर एक मोठी निळी माशी खुशाल बसलेली दिसत होती !

मीं चपापून नि त्रासून म्हटलें,"आपण म्हटलंत तें अगदीं खरं आहे. प्रेपोझिशन म्हणजे इंग्रजीचा आत्माच जणूं ! "

" ठीक, ठीक, काय बोललांत पण आपण ! हें मुलांना समजावं म्हणून प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पण मला कांहीं तें त्यांच्या गळीं उतरवतां आलं नाहीं. आजकालचीं मुलं–एम. ए. पास झालेले देखील–इंग्रजींत एक ओळ लिहायची झाली कीं पांच चुका करून बसतात ! " आणि एवढें म्हणून स्वारी फणकाऱ्यानें चालती झाली !

सर्वांचे डोळे त्या स्वारीकडे टक लावून पाहत आहेत असें मला दिसलें. माझ्या मनांतील खळबळ ओळखूनच कीं काय, हृदय प्रामाणिक किंचित् हंसून म्हणाला,

" हुजूर, स्वारीचं कांहीं मनांत नका आणूं आपण ! वेडा आहे तो !

" वेडा ? "

" हो, वेड लागलंय् त्यांना. पूर्वी हेडमास्तर होते. आतां—"

त्याचें बोलणें संपण्याआधींच लोकांची आणखी एक झुंड आली. हां हां म्हणतां पुनः मी कामांत गढून गेलों. मृत्यूचें तांडव इतकें चाललेलें असतांनाही ज्या दुर्दैवी माणसांना मरतां आलें नाहीं, तीं आतां जगण्यासाठीं प्राणांतिक प्रयत्न करूं पाहत आहेत !

संध्याकाळच्या डाकेनें अनूचें पत्र आलें.

गडद निळ्या रंगाचा लिफाफा. अनूला बारीक वळणदार अक्षरात खूप खूप लिहायची संवय. हें पत्रही तसेंच लिहिलेलें. तिच्या हातबॉक्सचा मधुर गंध त्या पत्राच्या सर्वांगाला जणूं वेढून राहिलेला. आज पंधरा दिवस झाले. सारखा दौऱ्यावर आहें. तिची भेट घेण्याची संधि कांहीं या पंधरवड्यांत लाभली नाहीं. एकांत आणि नित्यानंद. गांवांत संध्याकाळची खिन्न छाया पसरूं लागली व त्याबरोबरच माझें मनही भरून येऊं लागलें ! लग्न झाल्यानंतर केव्हांही इतक्या दिवसांचा वियोग, इतकें दूर राहणें, सहन करण्याची पाळी आलेली नव्हती. शाळामास्तरी आयुष्यांत दुःख अनेक होतीं; अभाव पुष्कळ होते; अतृप्त आशा-आकांक्षाही अगणित होत्या; पण हिंवाळ्यांतल्या या क्लान्त संध्याकाळीं निदान अनूपासून माझी ताटातूट तरी त्या वेळीं कोणास करतां येत नव्हती. उभ्या दिवसाच्या अतिवास्तवतेनंतर संध्याकाळचा रोमान्स दाटून येत असे. मेणबत्ती पेटवून तिच्या स्निग्ध प्रकाशांत आम्ही दोघे वैष्णव-पदावलि वाचीत असूं. आमच्या त्या आवडत्या ओळी...

सेइ कोकिल अब, लाख लाख डाकत लाख उदय कर चंदा--

—अन् खरोखरच आतां चंद्र वर आला होता. थंडीनें मरगळलेली ज्योत्स्ना धुक्यानें अधिकच विषण्ण दिसत होती. दूरचे माळ पांडुर प्रकाशानें मायामय होत चालले होते. गांवें जणूं काळ्या अंधाराच्या विखुरलेल्या पुंजक्यासारखीं दिसत होतीं. माळाजवळूनच एक क्षीण नदी ज्योत्स्नेचें आणि हिमाचें पांघरूण घेऊन जणूं झोंपी गेली होती...

असेंच बसून राहवेना. शीतकालांतील ज्योत्स्ना जणूं हांकारीत होती. माळावरून थोडें हिंडून आलें तर ?...असा विचार करून अंगांत एक ओव्हरकोट चढविला आणि निघालों फिरायला.

एक निरुंद पाऊलवाट. दुतर्फा दाट गवत वाढलेलें. गवताचीं कुसें आणि काटेकुंटे अधूनमधून भरलेले. अवघी सृष्टि शिशिरानें भिजवून टाकली होती. माझ्या पायांतले बूट देखील ओले चिंब झाले. बंगालमधील डोळ्यांतील पाण्याप्रमाणें शिशिरबिंदु चंद्रप्रकाशांत चमकत होते. थंडीच्या दिवसांत सापांचें भय नसतें, म्हणून मन ताळ्यावर नसलेल्या माणसासारखा आकाशाकडे पाहत मी चालत होतों.

चंद्र धुक्याआड हंसत होता. अनूच्या अश्रुसजल मुखासारखा! मनांत एक प्रकारची शून्यता वावरत होती. वाटलें, छे: ! आतां हें असें नाहीं चालायचें. कसेंही करून निदान दोन दिवसांसाठीं कां होईना, पण तिला एकदा भेटून यायलाच हवें !

फिरतां फिरतां त्या छोट्या नदीपाशीं येऊन थडकलों.

चोंहोंकडे गवत वाढलेलें. चार बांबू आडवे टाकून नदी ओलांडण्यासाठीं एक गांवठी पूल तयार केलेला. त्या पुलाखालून नदीचें गढूळ पाणी वाहत होतें. मध्येंच एकाद्या बेटाप्रमाणें कांहीं झाडाझुडपांचा पुंज मस्तकें उन्नत करून उभा होता. मासे पकडण्यासाठीं येथून व्यवस्था होत असेल बहुतेक.

मधून मधून कातळ होतें. त्यांतील एका कातळावर रुमाल पसरून बसलों. नदीपलीकडे काशवन दिसत होतें. त्याच्यावर जणूं प्रेतकळा आली होती. समोर चंद्र चमकत होता. शून्य नजरेनें मी चंद्राकडे पाहत बसलों. अनू जवळ असती तर...

" नमस्कार साहेब—"

मी एकदम दचकलों ! वाटलें, या गांवच्या शाळेचे हेडमास्तरच असावेत बहुतेक ! अंधुक प्रकाशांत स्पष्ट दिसत नव्हतें; पण त्यांच्या फुटक्या चष्म्याच्या कांचा मात्र चकाकत होत्या.

" हवा खाताहांत वाटतं ? पण साहेब, ही थंडी किती भयंकर ! आजारी पडाल तुम्ही असे बसून राहिलांत तर. त्यापेक्षां चला ना, माझी शाळा घ्या पाहून ! त्या शाळेखातर किती खस्ता खाल्ल्या, किती हंसं करून घेतलं ! खेडींपाडीं हिंडलों; मुलं जमविलीं ! चलाच साहेब–पाहून येऊं एकवार ती शाळा. "

मीं भीतीनें म्हटलें, "अहो, अशा रात्रीच्या वेळीं शाळा कुठून आलीय्-"

"साहेब, आजकाल दिवसा, रात्रीं-सर्व वेळीं शाळा चालू असते ! मेहरबानी करा साहेब, आणि माझ्या शाळेला धूळभेट द्याच ! आपल्यासारखीं थोर माणसं नेहमींच कुठून मिळायला ? चला आत्तांच."

हेडमास्तर थेट मझ्यासमोर येऊन वांकून उभे राहिले. त्यांच्या चष्म्याआडची वेडसर नजर—माझ्या शिरास्नायूनें तिची जाणीव मला होऊं लागली. इतक्यांत एक दुर्गंधयुक्त निःश्वास माझ्या मुखावर येऊन आदळला—वन्य जंतूंच्या निःश्वासासारखा !

वाटलें, असेंच उठावें आणि पळ काढावा ! पण फुटक्या चष्म्याचीं दोन भिंगें आपल्या जळजळीत नजरेनें माझ्याकडे टक लावून पाहत होतीं. मनांत आलें, तीं जणूं माझ्यावर हिप्नॉटिझमचा प्रयोग करीत आहेत !

बर्फासारख्या गारगार आणि भल्यामोठ्या कोळ्याच्या पायासारख्या काळ्या काळ्या वेडेवांकड्या बोटांनीं हेडमास्तरांनीं माझा हात घट्ट दाबून धरला. माझें सारें शरीर भीतीनें शहारून आलें. पण माझ्या तोंडून शब्दही उमटेना ! जळत्या चष्म्याआडच्या त्यांच्या त्या दोन दुर्बोध डोळ्यांकडे मी नुसता पाहत राहिलों. वाटलें, समोर दिसत आहे तें माणूसच आहे ना ? कीं भूत आहे ?— नदीपलीकडल्या स्मशानघाटांतून एकादा अशरीरि आत्मा तर नाहीं माझ्यासमोर उभा ? हा हेडमास्तर, कीं मृत बंगालची ही प्रेतमूर्ति ?

"साहेब, चलाच आपण, मेहरबानी करून चलाच !"

एकाद्या मोठ्या कोळ्याच्या हिमशीतल पायांनीं हात घट्ट धरून ठेवावे, त्याचीं नखें कातडींत बोंचावीत, तसें मला झालें. त्याच्या हातांतून आपला हात सोडवून घ्यावा असें मला वाटलें; पण तें कांहीं साधलें नाहीं. पौषांतील थंडीच्या थरकांपांत भीतीच्या थरकांपाची भर पडली आणि माझें सर्वांग थरथरूं लागलें.

मीं कांपऱ्या आवाजांत म्हटलें, "उद्यां सकाळीं—"

"नाहीं साहेब, आपली कसलीही सबब, कसलंही निमित्त, मी ऐकून नाहीं घ्यायचा. आज आतांच आलं पाहिजे आपण; हात जोडून विनवणी करतों साहेब ! माझे केस काळ्याचे पांढरे झाले या शाळेपायीं. अर्धपोटीं राहिलों

आणि शाळा सुरू केली, भरभराटीस आणली–आणि...आणि ही शाळा नुसती पाहायला देखील आपण अनमान करणार ?"

कां कोणास ठाऊक, पण मी मुकाट्यानें चालायला लागलों. दंवानें भिजलेला माळ ओलांडून आम्हीं घनदाट आंबराईतून चालूं लागलों. पायां-खालीं गवत वाढलें होतें. वाळून गेलें होतें, तें तुडवीत तुडवीत पुढें आलों तों समोर शाळेची आठखणी ' इमारत ' दिसली ! गवती छप्पर ! अर्धी अधिक पडून गेलेली, सडक्या पानांची व धुळीची घाण ! झांवळी छपरांतून चांदणें आंत आलें होतें. अंगावर ठिपके असलेल्या एकाद्या विचित्र सापा-सारखें दिसत होतें तें चांदणें !

हेडमास्तरांनीं माझा हात धरला आणि मला त्या इमारतींत नेलें. मी स्तब्ध उभा राहून सडक्या पानांची आणि धुळीची घाण श्वासाश्वासानें आंत घेऊं लागलों-

हेडमास्तरांचें प्रवचन सुरू झालें, "हीच माझी शाळा, साहेब. या शाळेच्या पायीं उभी हयात घालविली. रक्ताचा एकेक थेंब आटवीत आटवीत, सांठ-वीत ही शाळा उभी केली. बायकोच्या गळ्यांतली माळ विकून टाकली आणि या खोपटावर कौलें घातलीं. खेड्यापाड्यांतल्या मुलांमुलींना शिक-वावं, हेडमास्तर व्हावं, ही होती आशा. लहानपणापासनं उरीं बाळगलेल्या या आशेपायीं हें सारं केलं ! पण साहेब...साहेब...हा दुष्काळ–हा दुष्काळ कां हो आला मध्येंच ? कुठं गेलीं माझ्या शाळेंतलीं मुलं ? पुष्कळशीं मुलं अन्न अन्न करीत तडफडत तडफडत मेलीं ! बरींचशीं शहरांत पळून गेलीं ! साऱ्या आयुष्यभर मीं एक स्वप्न उभारलं, पण माझं तें स्वप्न कोणी, कां भंगून टाकलं ? आपण सांगूं शकाल मला ?"

माझ्याच्यानें कांहींच बोलवलें नाहीं. विस्फारित डोळ्यांनीं त्यांच्या फुटक्या चष्म्याकडे मी नुसता पाहतच राहिलों !

" नाहीं, नाहीं साहेब, तसं होणं शक्यच नाहीं !" हेडमास्तर एकदम ओरडले ! त्यांच्या या ओरडण्यानें शाळेच्या त्या भग्न इमारतीला भीतीनें जणूं कांपरें भरल्यासारखें वाटलें !

" आहेत–आहेत, सारीं मुलं आहेत ! तीं कुठंही गेलेलीं नाहींत, कुठंही जाणार नाहींत, कुठंही जाऊं शकणार नाहींत ! ! आपण ऐका आतां साहेब, कसं शिकवतों बघा मी ! "

मीं स्वतःला प्राणपणानें आवरलें. येथून पळालें पाहिजे, धूम ठोकली पाहिजे. एकवार हेडमास्तरांच्या दिशेनें पाहिलें. ते जणूं काय स्वतःतच बुडून गेलेले दिसले ! माझ्या अस्तित्वाचा जसा कांहीं त्यांना विसरच पडलेला होता !

मी निमूटपणें, रोमांचित शरीरानें, तेथून बाहेर आलों. आणि नंतर भराभर पावलें टाकीत आंबराईंतून चालूं लागलों. फक्त दुरून हेडमास्तरांचे मर्मभेदी शब्द ऐकूं येऊं लागले.–" आधीं 'इन' आणि 'ऑन' यांचा आपण समाचार घेऊं. या दोहोंचा उपयोग..."

आंब्याच्या झाडांवरून वाळून गळून पडलेलीं पानें पावलाखालीं कुरकुर करूं लागलीं. जसा कांहीं मी चोरासारखा पळूनच चाललों होतों ! मनांत आलें, " हें विद्येचं तीर्थक्षेत्र–खरंखुरं तीर्थ ! या ठिकाणीं राहायचा हक्क मला नाहीं ! माझ्या नुसत्या सांवलीनंही इथल्या अवघ्या वस्तूंची शुचिता मलिन होऊन जाईल !...मी...मी...व्रतच्युत, लोभी, पट्टीचा स्वार्थसाधु !"

माझ्या उंची कोटाची क्रीज ज्योत्स्नेच्या प्रकाशांत झकाकूं लागली.

अंमलदारी बुटांच्या उद्धट पदक्षेपानें धुळीनें भरलेली गांवची पाऊलवाट आर्त नाद करूं लागली.

मंत्रघोषासारखा हेडमास्तराचा कंठस्वर दूर दूर अस्पष्ट होऊं लागला आणि नदीपलीकडच्या काशवनांत कोल्हे तारस्वरानें कोल्हेकुई करूं लागले !

# पाइप



काहीं दिवसांपूर्वी वर्तमानपत्रांत एक बातमी प्रसिद्ध झाली होती. ती आपण वाचली कीं नाहीं मला माहित नाहीं.

पदार्थ–विज्ञानशास्त्राचे सेवानिवृत्त प्रोफेसर पी. के. चौधरी आगींत जळून मेले. रात्रीं झोंपण्याआधीं बिछान्यांत पडल्या पडल्या ते पाइप ओढीत होते. पाइपमधील अग्निकण अवचित् मच्छरदाणीवर पडला. मच्छरदाणीनें पेट घेतला. आणि नंतर—

संक्षिप्त बातमी. जगांत चाललेल्या युद्धांतील निरनिराळीं रणक्षेत्रें, निरनिराळ्या राष्ट्रांतील भांडणें वगैरेंच्या बातम्यांच्या गर्दीत या बातमीला फारशी जागा मिळालेली नव्हती.

त्यानंतर तीन एक दिवसांनीं वर्तमानपत्रांत प्रोफेसर चौधरी यांच्या गुणमुग्ध विद्यार्थ्यांनीं डेहराडून येथें भरवलेल्या दुखवट्याच्या सभेचा वृत्तांत आला होता. त्यानंतर गांधी–जिन्हा बैठक, पूर्व प्रशियांत जर्मनांचा व्यूहभेद, हॉलंडमधील भयंकर लढाई, मास्कोंतील महत्त्वाच्या वाटाघाटी–बातम्यांचा पूर ! रॉयटरमार्फत सुटलेल्या जगांतील बातम्यांच्या झंझावातानें प्राध्यापक चौधरींच्या मृत्यूची बातमी पिकून गळून पडलेल्या पानाप्रमाणें कोठच्या कोठें वाहून गेली. लोक ती बातमी विसरले. पण—

पण, मला ती बातमी इतक्या सहजासहजीं विसरतां यायची नाहीं.

सुनंदाताईशीं ओळख झाली ती आमच्या पार्टीच्या ऑफिसमध्यें.

ती बोलायची कमी, पण गोड गोड हंसायची पुष्कळ ! प्रथम प्रथम भारी संकोच वाटे. थोडें अंतर ठेऊनच तिच्यासंगें बोलत फिरत असें. तिच्या सांवळ्या पण प्रसन्न चेहऱ्यावर ओजस्वी भावनेची दीप्ति दिसे. पाहणाऱ्याचें मन एका अज्ञात सश्रद्ध शंकेनें आपोआपच जिथल्या तिथें थबकून राही.

पण, खुद्द सुनंदानेंच संकोच नाहींसा केला.

हिंवाळ्याची रात्र. जवळ जवळ नऊ वाजलेले. पार्टी ऑफिसमध्यें आम्ही तिघेचौघे खूप जोरजोरानें चर्चा करीत बसलों होतों. तोंच सुनंदा मागून आली नी माझ्या खांद्यावर तिनें हात ठेवला.

मी एकदम दचकलों. सुनंदा हंसत म्हणाली, "पुरे करा बाबा तुमचा हा वादविवाद. परीक्षा जवळ आली आहे, उठा आतां. शहाण्या मुलांसारखे चला घरीं."

मीं संकोचानें म्हटलें, "हो, हो—हा पाहा निघालोंच."

यावर ती म्हणाली, "आशीर्वाद नकोत, आत्तां निघालं पाहिजे—म्हणजे मला सोबत केली पाहिजे. तुम्ही तर आमच्या गल्लींत राहतां."

चर्चा तशीच अर्धवट ठेऊन उठावें लागलें. म्हटलें, "चला."

सदर्न ॲव्हेन्यूच्या कोंपऱ्यावर आम्ही दोघेजण ट्रॅममधून उतरलों. हिंवाळी आकाशांतून बर्फाचा चिपांप्रमाणें हिमवर्षाव होत होता. दुतर्फाच्या घरांनीं एवढ्यांतच काळ्या रात्रीच्या स्तब्धतेंत स्वतःला गुरफटवून घेऊन पेंगायला सुरुवात केली आहे असें वाटत होतें. एके काळीं या ॲव्हेन्यूमधील दिवे कृत्रिम चांदणें पसरून रोजच्या रात्रीला वासंती पौर्णिमेचा साज चढवीत. आज काळ्या रंगाच्या दाट प्रलेपांतून तेच दिवे मढ्याच्या डोळ्यांसारखे दिसत होते.

सावकाश चाललेल्या टू सीटरला मागें टाकून झांशी ट्रक राक्षसासारखा धांवत चालला होता. त्याच्या हेड लाइटच्या प्रखर प्रकाशानें दवानें भिजलेला डांबरी काळा रस्ता आगीनें धगधगल्यासारखा वाटत होता.

मला डाव्या बाजूला जायचें होतें, सुनंदला उजव्या. ट्रॅम-स्टँडसमोर उभ्या उभ्या ती कशाचा तरी विचार करीत असावी असें वाटलें. मीं तिच्याकडे पाहिलें. तोंच ती म्हणाली, "रंजन, आणखी चार पावलं पोंचवायला आलांत तर गैरसोय होईल का तुमची ? या वेळेस मेले सोल्जर दारू पिऊन तर्र होऊन रस्त्यांतून भटकत असतात म्हणून—"

"चला, चला, चारच पावलं कां ? चांगलं घरापर्यंत पोंचवतों."

"त्रास होईल उगाच. पण फारसं दूर चालावं लागणार नाहीं. थोडंसं पुढं गेलं कीं आलंच आमचं घर."

खरेंच, तिचें घर फारसें दूर नव्हतें. थोडेसे पुढें गेलों तों एक वळण लागलें. त्याच्या शेजारींच एक एकमजली इमारत. तिथवर गेल्यावर म्हटलें, " अच्छा, सुनंदाताई, येतों तर मी. "

" येथवर आलांतच, आतां आंत या. जरा वेळ बसा, चहा घ्या आणि मग जा. "

म्हटलें, " छे छे ! आधींच उशीर झालाय्-इतक्या रात्रीं—"

"कुठाय रात्र ? आत्तां कुठं साडेनऊ वाजताहेत-भ्यायचं कांहीं कारण नाहीं तुम्हाला. दहा मिनिटांत आटोपतें. जास्त वेळ मुळींच ठेऊन घ्यायची नाहीं मी."

दरवाजा भिजून गेला होता. तसाच लावून घेतलेला होता. हळूच धक्का देऊन आम्ही दिवाणखान्यांत आलों.

दिवाणखान्यांत दिव्यांचा झगझगीत प्रकाश उत्तम रीतीनें सजविलेला. पुस्तकांनीं भरलेलीं कपाटें. लहान टेबलावर कित्येक शास्त्रीय मासिकें. ठिक-ठिकाणीं उठून दिसतील अशा प्रकारें हस्तिदंताच्या कलाकृति. एके बाजूस एका डेक-चेअरवर सर्वांग ओव्हरकोटांत लपेटून घेऊन एक वृद्ध गृहस्थ ध्यानस्थ बसले होते. प्रशांत, सौम्य मूर्ति ! माथ्यावरले पिकून पांढरे झालेले केस विद्युत् प्रकाशांत चकाकत होते.

सुनंदानें हलक्या स्वरांत म्हटलें, " हे आमचे वडील. डेहराडूनला प्रोफे-सर होते. पॅरॅलिसिसनं ( अर्धांगानं ) आजारी आहेत."

आमच्या पावलांचा आवाज ऐकूं येतांच त्यांनीं डोळे उघडले व आमच्याकडे टक लावून पाहिलें. त्यांचे ते डोळे पाहतांच मी थक्कच झालों ! किती अद्‌भुत डोळे ! जंगली पशूंच्या दृष्टीसारखी त्यांची दृष्टि प्रखर प्रकाशानें चकाकत होती. पक्षाघात गृहस्थ—शरीरांतली सारी शक्ति जणूं त्यांच्या डोळ्यांत केंद्रित झालेली होती ! अशी तीक्ष्ण नि ज्वलंत दृष्टि उभ्या जन्मांत कधीं माझ्या नजरेस पडली नाहीं. हेच ते प्रोफेसर पी. के. चौधरी तर !

सुनंदा म्हणाली, " भाई रंजन, जरा बसा आपण; मी चहा करून आणीतोंवर बाबांशीं गप्पा मारा."

मीं म्हटलें, " ते आहेत आजारी. बोलून त्यांना उगाच त्रास—"

" छे, छे ! बोलायला मुळींच हरकत नाहीं. बाबांना गप्पा किती आवडतात—कल्पना नाहीं तुम्हाला. बसाच आपण, संकोच मुळींच नका करूं."

सुनंदा आंत निघून गेली.

प्राध्यापक चौधरी प्रखर दृष्टीनें टक लावून माझ्याकडे पाहत होते. किती भय वाटलें मला ! कसेंसेंच वाटण्याच्या जाणीवेनें माझें सारें शरीर शहारलें. ते मात्र शांत होते. नंतर अगदीं हलक्या, जवळ जवळ निःशब्द स्वरांत ते म्हणाले, " बसा ना."

त्यांच्या दृष्टींत व कंठस्वरांत कसलेंच साम्य नव्हतें. त्यांच्या स्वरांतून स्नेह व प्रसन्नता जणूं ओसंडून वाहत होती. त्यांनीं विचारलें, " काय करीत असतां आपण ?"

" एम्. ए.चा अभ्यास करतों. लवकरच बसणार आहें परीक्षेला."

" आणखी काय करतां ? पार्टीवर्क ? "

मी गालांतल्या गालांत हंसलों नि खालीं पाहूं लागलों.

" नाहीं, नाहीं. मी 'डिस्करेज ' करत नाहीं तुम्हाला. जीवनांत डेफिनिट ' लाइन ' निवडून चालणं हेंच योग्य असतं. ती ठरली कीं वाट चालायची शक्ति येते. भली असो, बुरी असो, निश्चित लाइन मात्र पाहिजे माणसाला ! नंदाला मी कधीं मनाई करीत नाहीं—याचं कारण देखिल हेंच !"

यावर मी काय बोलणार ? नुसतें म्हटलें, " खरं आहे आपलं म्हणणं !"

चौधरींनीं अंग हलवीत उठून बसण्याचा प्रयत्न केला. या प्रयत्नांत त्यांना किती बळ खर्चावें लागलें, हें त्यांचा चेहरा पाहतांच मला जाणवलें. त्यांचा चेहरा लाल लाल झाला. त्यांच्या डाव्या हाताचीं बोटें थरथर कांपूं लागलीं होतीं. पक्षाघाताचा परिणाम हा ! स्वतःच्या शरीरावर त्यांचा किंचित देखील ताबा उरला नव्हता. किती शोचनीय, किती करुण दृश्य !

माझें मन व्यथेनें भरून आलें !

दमल्याचे सुस्कारे सोडीत त्यांनीं आपल्या मस्तकावरल्या दिव्याकडे पाहिलें !

त्यांचे ते उज्ज्वल, आणि दीप्तिमंडित डोळे विजेसारखे लकाकले !

अंमळशानें आपल्या खोल गेलेल्या, दबलेल्या स्वरांत ते म्हणाले, " समजा, कीं आपला हा भारतवर्ष स्वतंत्र झाला. त्यानंतर काय होणार ?"

त्यानंतर काय होणार ? किती बिकट प्रश्न ! कोणतें उत्तर दिल्यानें त्यांना आनंद वाटेल हें कांहीं ध्यानांत येईना. कांहीं तरी बोलायचें म्हणून म्हटलें, " मग काय ? हरतऱ्हेनें उन्नति करण्याचा प्रयत्न करायचा. "

" कसली उन्नति ?"

पुन्हां संकटांत सांपडलों. म्हटलें, " इंडस्ट्रियल, ॲग्रिकल्चरल,—"

" बस, बस !" ऐकूं येणेंही कठीण इतक्या खोल स्वरानें ते म्हणाले, " इंडस्ट्री हवी, इंडस्ट्री हवी ! कारखाने हवेत. फॅक्टऱ्या हव्यात. भारतवर्षाला वांचवायचं असेल, तर मोटमोठया गिरण्या-कारखान्यांवांचून गत्यंतर नाहीं. "

" बरोबर आहे आपलं म्हणणं. "

" प्रामिथिअस म्हणजे कोण हें आहे का माहित ? "

" हो. पहिला विद्रोही मनुष्य. या पृथ्वीवर अग्नि घेऊन आला होता तो."

" बरोबर, अगदीं बरोबर. पहिला बंडखोर !" पुन्हां हालचाल करून उठून बसण्याचा प्राणांतिक प्रयत्न त्यांनीं केला. इतक्या निःशब्द स्वरांत इतकी तीव्रता संचारूं शकते यावर माझा स्वप्नांत देखील विश्वास बसला नसता. आणि त्यांचे ते डोळे ! प्रामिथिअसचा अग्निच जणूं त्यांच्या डोळ्यांत अवतरलेला ! !

" आपण त्याचेच वंशज. या अग्नीनं आपल्या संगतीं आशीर्वादही आणले, अभिशापही आणले ! या अग्नीनंच सुरुवातीस आपण कच्चं मांस शिजवून खाल्लं. अग्नींत आहुति दिली. आलेक्झांड्रियामधील ग्रंथालयं जाळून टाकली !

बर्नरमध्यें व फर्नेसमध्यें या अग्नीनंच विज्ञान देवतेला आपण हव्य अर्पण केलं. आणि या अग्नीनंच आपण ' इन्सेंडरी बॉम्ब ' निर्माण केले ! काय, मी म्हणतों तें खरं कीं नाहीं ?"

भारून गेलेल्या माणसासारखें मीं म्हटलें, " अगदीं खरं."

"पंचवीस वर्ष ' अप्लाइड फिजिक्स' संबंधीं मीं अध्ययन केलं, चर्चा केली, शोध लावले. ' पॉझिट्रान ' 'न्यूट्रान ' नी ' मेसिट्रान ' या थिएरीज

मला नाहीं आवडत. अर्थात्‌च थिअरी म्हणून त्यांचं मोल आहेच. पण, मी ओळखतों फक्त वास्तव ! ही पृथ्वी वास्तव आहे–अति वास्तव आहे !! आणि या पृथ्वीहूनही मोठं सत्य म्हणजे अग्नि !"

"अग्नि ?"

"हो, अग्नि ! अग्नीखेरीज या जगांत आहे काय ? लॅब्रोरेटरींत जा, तिथं अग्नि धगधगतो आहे. इंजिनांत अग्नि, डायनामोंत अग्नि. विद्युतांतील अग्नि माणसाच्या हातीं आला. लोखंड, पोलाद, अग्नींतून पवित्र होऊनच बाहेर पडलं आहे. अग्नि नसता तर त्यांच्या अंगचे गुणधर्म प्रगटलेच नसते ! मानवी जीवनांत जी कांहीं गति नी प्रगति आहे, ती सारी या अग्नीमुळंच ! अग्नि ध्वंस करतों, निर्माणही करतो ! तो शिव आहे नी रुद्रही आहे !! एकाच वेळीं दोन्हीही !"

मी कांहीं न बोलतां स्वस्थ राहिलों. त्यांच्या म्हणण्यांत वैज्ञानिक सत्य मुळांतच आहे का नाहीं ? असेल तर तें किती प्रमाणांत आहे ? मला माहित नाहीं. पण, प्रोफेसरसाहेबांचे ते डोळे नी त्यांचा तो स्वर !

बाहेर हिंवाळयांतली काळी रात्र पसरली होती. टक टक करीत दंव पडत असल्याचा आवाज कानावर पडत होता. हिंवाळी वारा खिडक्यांच्या काचांच्या तावदानांवर थाप मारून परत जात होता. लेकच्या रस्त्यानें ट्रकचा उद्दाम गतिछंद आणि या दिवाणखान्यांत पक्षाघातग्रस्त वैज्ञानिक–मी मंत्र-मुग्ध झाल्यासारखा त्यांच्याकडे तसाच पाहत राहिलों.

ते बोलूं लागले, "आदिमानव अग्नीची पूजा करीत असे. वैदिक मनुष्य सर्व देवतांच्या आधीं अग्नीला वंदन करी–'अग्निमीडे पुरोहितं यज्ञस्य देव-मृत्विजम्' हें वचन आजही खरंच आहे. अग्नि हाच विज्ञानाचा पुरोहित. तोच 'होतारं रत्नधातमम्' थोडक्यांत सांगायचं, तर आपण सारेच अग्नीचे उपासक ! होय कीं नाहीं ?"

इतक्यांत सुनंदानें चहा आणला. हंसत हंसत ती वडिलांना म्हणाली, "बाबा, यांना तुमचीं अग्निवंदनं ऐकवितांहात वाटतं ?"

प्रो. चौधरी हंसले. त्यांचा स्वर अधिकच कोमल व प्रशांत झाला. त्याच स्वरांत ते म्हणाले, "हो. अग्निकथाच सांगत होतों यांना. पण बाळ, तूं

माझा पाइप आण पाहूं तयार करून. पाहिलंत, अग्नि हा सर्वपावन ! तो नसेल तर पाइपदेखील अचल !"

सुनंदानें पाइप तयार करून आणला. वीस मण ओझ्याचा दगड शक्ति खर्चून उचलावा लागतो, तसा प्रोफेसरसाहेबांनीं आपला हात वर केला आणि हलकेंच एक झुरका घेतला.

ते बोलूं लागले, "स्वातंत्र्य ! स्वातंत्र्याखातर, मानवाच्या मुक्ततेखातर तुम्हीं आंदोलन करतांहांत ! तें स्वातंत्र्य कसं येणार ? कशानं येणार ? नुसत्या राजकीय अधिकारानं तें मिळायचं नाहीं. पंचवीस वर्षांचा अनुभव आहे माझा. त्या अनुभवानं मला स्पष्ट कळून चुकलंय् ! स्वातंत्र्य माणसाच्या यांत्रिक प्रगतींत आहे. मोठमोठाल्या कारखान्यांत आहे, फॅक्टऱ्यांत आहे ! देशभर अग्नि पेटवला पाहिजे, बर्नर्सनीं, फर्नेसिसनीं, डायनामोंनीं ! माणसाच्या कर्तृत्वाची ओळख, त्यानं निर्मिलेल्या यंत्रावरनं होत असते. त्याच्या सार्थकतेचा जयजयकार यंत्राच्या यशांत होत असतो ! अन् त्या यंत्राची देवता कोणती ? अग्नि ! साऱ्या पृथ्वीवर अग्नि प्रज्वलित करा, अन् पाहा तुमच्या साऱ्या समस्या सोप्या होतात कीं नाहीं तें !"

सुनंदा उद्गारली, "नात्सी जर्मनीनं अग्नि पेटवून दिला, तसा का अग्नि पेटवून द्यायचा आपण ?"

"नाहीं, नाहीं, नाहीं !" खोल गेलेला आवाज जितका चढवून बोलतां येणें शक्य होतें, तेवढा चढवून ते म्हणाले, "नाहीं बाळ ! अग्नीचं तें रुद्र स्वरूप ! त्याचं प्रयोजन नाहीं असं नाहीं. पण शिवस्वरूप अग्नीला कां विसरावं आपण ? शिव हाच सृष्टीचा धर्म–!"

पाइपमधून प्रोफेसरसाहेबांच्या चेहऱ्यासमोर धूम्रवलयें पसरलीं होतीं. जणूं गूढतेचें धुकें दाटत होतें ! त्यांच्या दुबळया, पंगु शरीरांतील सारी शक्ति एकवटून जणूं डोळयांवाटे बाहेर पडूं पाहत होती. धूम्रवलयें दाटत चाललीं. आगामी युगाचें अग्निमय स्वप्न त्यांच्या सर्वांगांत आकार धारण करीत आहे असा मला भास झाला. जगाच्या दृष्टीनें ते असून नसल्यासारखे, एकदम निरुपयोगी ! पण, या व्यक्तींतच विराट भविष्यकाळाच्या कल्पनेनें आणि कर्मप्रेरणेनें त्यांची सारी चेतना जागृत झालेली दिसूं लागली.

ते बोलूं लागले, " आज माझ्या अंगीं ताकद असती, तर याच मंत्राचा प्रसार केला असता मीं ! नुसत्या तोंडानं नव्हे, तर कृतीनं देखील ! शेतकीची वाढ करून काय होणार ? ग्रामोद्धाराच्या फुसक्या योजनांनीं काय होणार ? लोखंड अन् अग्नि—प्रागतीचा हाच नि हाच एकमेव मार्ग ! स्वातंत्र्याचं हेंच एकमेव उद्दिष्ट ! "

मीं त्यांना नमस्कार केला व त्यांचा निरोप घेऊन बाहेर पडलों.

यानंतर जवळ जवळ चार वर्षांनीं काल सुनंदाकडून पत्र आलें.

त्यांत लिहिलें होतें.

" त्या वेळीं आमच्यापैकीं कुणीच घरांत नव्हतं. बाबा पेंगतां पेंगतां, पाइप ओढीत बसले असावेतसं वाटतं. त्यांतलीच एकादी आगीची ठिणगी मच्छरदाणीवर पडली असावी, भडका उडाला असावा ! आज मनश्चक्षूंसमोर मला सारं दिसतं आहे ! अग्नि पुढं पुढं येत आहे अन् बाबा ? —बाबा, आपणास खाऊन टाकण्यासाठीं, आपली राख करून टाकण्यासाठीं आ पसरीत येत असलेल्या त्या अग्नीकडं पाहत आहेत—भीति केविलवाण्या नजरे नं—किती असाहाय्यपणं ! ओरडायचा उपाय नाहीं, हालायची, सरकायची शक्ति अंगांत नाहीं ! अन् अशा त्या स्थितींत, साऱ्या जागत्या जाणीवांनीं, भीतिविव्हल डोळ्यांनीं, बंदिस्त, असाहाय्य मुलाप्रमाणं, त्यांनीं अग्निमुखांत आत्मसमर्पण केलं !

" माझ्या मनांत काय आलं, सांगूं ? आयुष्यभर ज्यांनीं अग्नीची उपासना केली, त्या उपास्य देवतेच्या पायींच स्वतःचा बळी देऊन त्यांनीं आपल्या अग्निव्रताचं उद्यापन केलं...!"

पण माझ्या मनांत दुसराच विचार होता..." अवध्या पृथ्वीवर अग्नि पेटवण्याचं स्वप्न ज्यानं जन्मभर पाहिलं, त्यांना यःकश्चित्—पाइपच्या आगीपासून देखील स्वतःला वांचवतां आलं नाहीं ! स्वतःचं रक्षण करतां आलं नाहीं. तें कां ?—कां ?"

तर्करत्न कालीपूजेस बसले होते.

शुक्ल चतुर्दशीची रात्र. आश्विनांतलं ज्योत्स्नाशुभ्र आकाश. कोठून तरी काळ्या काळ्या ढगांचे पुंजच्या पुंज आले नि त्यांनीं ती शुभ्रता झांकळून टाकली. संध्याकाळीं वितळविलेल्या चांदीच्या रसाप्रमाणं चकाकणारं नदीचं पाणी आतां किती बदललेलं होतं ! काळा आणि हिरवा पिवळा रंग मिसळून त्यांच्या रंगानं जणूं भयंकर रूप धारण केलं होतं. तर्करत्न भटजीबुवांनीं फिरून एकवार थोडीशी दारू घशांत ओतून घेतली आणि भयार्तविव्हल नजरेनं पाहिलं. नदीपल्याडलं जंगल छिन्नविच्छिन्न व आकारहीन राक्षसासारखं जागं होतं. हवेंत गारठा होता. त्यांच्या मनांत आलं, गारठा आहे खरा, पण माझ्या शरीरांत जणूं आग पेटते आहे. शरीरावरल्या केसांच्या रंध्रारंध्रांतून अग्निकणाप्रमाणं घामाचे थेंब बाहेर पडत आहेत !

शुक्ल चतुर्दशीच्या रात्रीं कालीपूजा ! ऐकायला किती विलक्षण, कुलक्षण आणि अशास्त्रीय वाटतं हें ! पण आजची ही कालीपूजा कांहीं एरवींची कालीपूजा नव्हे ! आसपासच्या साऱ्या खेडयापाडयांत पाहावं तिकडे मुडदेच मुडदे–कॉलऱ्यानं मेलेल्यांचे मुडदे ! नि ते मृत्यु तरी किती–सहा महिन्यांच्या मुलापासून तों साठ वर्षांच्या थेरडयापर्यंत, पटापट सारे मरून पडताहेत ! जशा माशा तडफडत तडफडत पटापट मरतात–तशीं हीं माणसं मरून पडताहेत ! पुरुष, स्त्रिया आणि मुलं–सारींच मरताहेत ! म्हणूनच देवीचा हा कोप शांत करण्यासाठीं स्मशानांत स्मशानकालीच्या पूजेची ही तयारी ! माणसं असाहाय्य झालीं. विपन्न झालीं कीं तिथींची नि नक्षत्रांची पर्वा, शुद्ध त्यांना उरतच नसते !

जवळच एक पेट्रोमॅक्स जळत होता. त्याचा पांढरा प्रकाश निळसर होत चालला होता–त्यांतलं तेल बहुतेक संपत आलं असावं ! त्या बत्तीच्या वर

आणि खालीं नाना प्रकारचे लहानमोठे किडे, पतंग जमले होते. त्यांचे ढीगच्या ढीग मरून पडलेले दिसत होते ! बत्तीपासून जवळच काशीराम कुंभार गांजा पीत होता. आणि मधून मधून अंगावर येऊन बसणारे किडे वगैरे झटकून टाकीत होता.

तोंडांतून गांजाची चिलीम अंमळ खालीं ठेवून त्यानं विचारलं, " आलं का ?"

असाहाय्य, कातर दृष्टीनं चोहोंकडे पाहत तर्करत्न म्हणाले, "छे: रे ! मुळीं चाहूल देखील नाहीं दिसत ! "

" रात तर भराभर धांवत चालली. नैवेद्य तयार होऊन किती तरी वेळ झाला. तें येण्याचं कांहीं लक्षण नाहीं दिसत ! "

" येणार नाहीं ? येणार नाहीं म्हणजे ?" वीरासनाच्या पवित्र्यांत बसलेले असूनही रक्तवस्त्रधारी तर्करत्न महाशय आपादमस्तक थरथर कांपूं लागले.

" नाहीं आलं खायला, तर काय होईल, आहे माहित ? देवीचं रक्तकुंड भरून जाईल. कोणी म्हणजे कोणीच वांचायचं नाहीं ! तूं वांचायचा नाहींस, मी वांचायचा नाहीं,–स्मशानकालीच्या क्रुद्ध नजरेनं भस्म होऊन जातील सारे ! कुणालाही जगण्याची शक्ति नाहीं उरायची. "

काशीरामच्या हातांतून गांजाची चिलीम खालीं पडली.

" भटजीबुवा, बोलावा कालीमातेला–मनापासून हांक मारा. इतकीं वर्षं तुम्हीं पूजापाठ केले, नवससायास केले. तुम्ही एवढे जाडे पंडित. अन् देवीला नैवेद्य खायला बोलावतां नाहीं येत ? मनापासून हांक मारा–मोठ्यानं हाक मारा देवीला. "

तर्करत्नांच्या तोंडचं पाणी पळूं लागलं होतं. कंठ सुकत चालला होता. शुष्क आवाजांत ते म्हणाले, " मी हांका मारतों आहें, पण—"

किंचित् दूर अंतरावर अंधारांत एका मोठ्या केळीच्या पानावर पोळ्यांचा ढीग पडलेला होता. मांसाचा ढीगही होता. त्याच्यावर लाल लाल फुलं होतीं. पेट्रोमॅक्सच्या क्षीण होत चाललेल्या प्रकाशांत तीं फुलं रक्तासारखीं दिसत होतीं. त्या नैवेद्याकडे हात करून तर्करत्न भरल्या कांपऱ्या गळ्यानं मंत्र म्हणूं लागले, " जय काली ! प्रसन्न हो, प्रसन्न हो ! तुझ्यासाठीं नैवेद्य ठेवलेला आहे त्याचा स्वीकार कर. अन् साऱ्या जगाची राखण कर—"

पण देवी कुठं होती ?

मध्यरात्र, स्मशान—नुसतं स्मशान म्हणून चालायचं नाहीं, महास्मशानच म्हटलं पाहिजे. खोल पाण्यानं व रेतीनं भरलेल्या नदीच्या कांठीं सुमारं तीन मैल-पर्यंत तें स्मशान पसरलेलं होतं. किती प्रेतं तिथं पुरायला, जाळायला येत याची गणतिच नाहीं. अर्धवट जळालेलीं हाडं, प्रेतांचीं मुंडकीं, कवट्या, चितेंतले कोळसे, जळलेले वांसे आणि फुटलेल्या मातीच्या कळशांचे ढीगच्या ढीग—बघावं तिकडे हेंच दिसे. दरवर्षी पुराच्या वेळीं नदी आपला किनारा ओलांडी, असंख्य चितांचे अवशेष, प्रेतांचीं मुंडकीं, जळलेलीं हाडं ती आपल्या पोटांत घेई. पण पुन्हां नव्या चिता जळूं लागत. धगागणाऱ्या अग्निशिखांचा प्रकाश त्या नदीच्या काळ्या पाण्यावर पडे. स्मशानाचा विस्तार वाढूं लागे. होतां होतां स्मशानाची सीमा गांवापर्यंत येऊन भिडली. पूर्वी स्मशानांत प्रेत न्यायचं म्हणजे तीन मोठमोठीं स्मशानं ओलांडून जावं लागे. पण आतां स्मशानांत उभं राहून ‘ राम बोलो भाई राम ’ म्हटलं, कीं गांवच्या घरां-घरांत त्याचा प्रतिध्वनि उमटे.

तर्करत्नांनीं मागं वळून पाहिलं. सगळीकडे सामसूम. गांव झोंपीं गेलेलं. झोंपीं गेलेलं ?–छे: ! भीतीनं मूर्च्छित झालेलं. मृत्यूनं बधिर बनवलेलं. ज्या घरांत सात सात माणसं नांदायचीं, तिथलीं चार माणसं मरून गेलेलीं. दोघं जिवाच्या भयानं शहरांत जाऊन कशींबशीं गुजराण करीत असलेलीं. उरलेलं माणूस कॉलऱ्यानं अंथरुणावर तळमळत असलेलं. ‘ घरोघरीं याच परी.’ शुक्ल चतुर्दशीच्या रात्रीला काळ्या ढगांनीं अमावास्येचा बुरखा चढवला होता. आकाशांत एका कोंपऱ्यांत विजेची सर्पाकृति चमकतांना दिसत होती. तिच्या प्रकाशानं निष्ठुर रक्तारक्त हंसण्याप्रमाणं नदीचं काळं काळं पाणी उजळून टाकलं होतं.

तर्करत्न पुन्हा देवीला आवाहन करूं लागले. “ देवी, महादेवी, महा-काली–प्रसन्न हो, प्रसन्न हो ! आम्हा भक्तांवर दया कर—”

रात्रीचे प्रहर निःशब्द पावलांनीं पुढं पुढंच चालले होते. जवळच्याच टाइमपीसमधले कांटे प्रदक्षिणा घालीत घालीत अडीचच्या घरांत येऊन टेपले होते. तर्करत्नांच्या हृदयांत पडणाऱ्या रक्ताच्या स्पंदनाबरोबर जणूं घड्याळाच्या कांट्यांनीं ताल धरला होता. टिक्, टिक्, टिक्, टिक्–

रात्रीची पहांट झाली. नी देवीनं नैवेद्य घेतला नाहीं, तर तर—काय ? संहार! सर्वांचा संहार !! या गांवांतल्यांचाच नव्हे, तर सर्व देशांतल्यांचा संहार. गांवं जातील, शहरं जातील, जिकडे तिकडे स्मशानच होईल. ब्राह्मण–ब्राह्मणेतर–सर्वांची एकच दशा होईल. तर्करत्नांचं मस्तक सुन्न होऊं लागलं. रुपयांच्या लोभानं आपण कालीपूजेचं हें काम पत्करलं, आपल्या गांवाहून इथं आलों. इथं काय ? सर्वनाश—!

गांजाच्या नशेंत काशीराम झिंगून पडला होता. केशव ढोलवाला ढोलक्यावर डोकं टेकून झोंपीं गेलेला होता. हे या अशा अवस्थेंत झोंप तरी कशी काढताहेत, कोण जाणे ! गांवाच्या दिशेकडून मधून मधून रडण्याचा आवाज कांनीं येत होता. त्या रडण्याचा प्रतिध्वनि आपल्या रक्तांतूनही ऐकूं येत आहे असा भास तर्करत्नांना झाला. सडलेल्या प्रेतांचा दुर्गंध वाऱ्याबरोबर नाकांत शिरे–गांवचे लोक प्रेताच्या तोंडावर आग ठेऊन, प्रेत तसंच टाकून, लगबगीनं घर गांठीत, त्याचा हा परिणाम ! तर्करत्नांनीं एकवार नदीच्या पाण्याकडे पाहिलं–आणि त्यांचं अंग शहारलं ! त्या घाणेरड्या पाण्यांत पांढरं पांढरंसं हें काय वाहून येत आहे ? प्रेत दिसतंय् ! प्रेत पाण्यांत पडलं कीं असं इतकं फुगतं का ? कधीं कल्पनाही नव्हती याची ! जंगलांतून कोल्ह्यांचं ओरडणं ऐकूं येत आहे—आणि स्मशानांतलीं कुत्रीं भुंकून भुंकून त्यांना प्रत्युत्तर देत आहेत. त्यांचं हें भुंकणं एकसुरी आर्त नादासारखं वाटतं आहे !

चोहोंकडे इतके कोल्हे आहेत आणि जरूरीच्या वेळीं एक देखील दिसत नाहीं, हें काय ?

कोल्ह्यानं नैवेद्य खाल्ला नाहीं, तर सारी पूजा व्यर्थ होऊन जायची !

तर्करत्न महाशय हे कांहीं शास्त्रीय युगांतल्या विचारांचे नव्हते. त्यांचा जुन्या शास्त्रावर विश्वास होता, देवीच्या महात्म्यावर विश्वास होता. त्यांचं उभं आयुष्य या विश्वासानंच पोसलेलं होतं. पंडित म्हणून त्यांची ख्याति होती. निरनिराळ्या ठिकाणांहून पूजापाठासाठीं, क्रियाकर्मासाठीं, त्यांना बोलावणीं येत. बंगालमधील बड्या बड्या धनी–मानी सद्गृहस्थांच्या घरांतून त्यांचा आदरसत्कार होई, मानसन्मानानं त्यांना निरोप मिळे.

—आणि आज ते या पूजेसाठीं आले होते. गांवचे समृद्ध सावकार व तालुकदार बलाई घोष यांनीं त्यांना तीनशें रुपये दक्षिणा देण्याचं ठरवून देवीचा कोप शांत करण्यासाठीं आणलं होतं...आजच्यासारखं संकट त्यांच्यावर उभ्या आयुष्यांत कधीं आलं नव्हतं. या क्षणीं त्यांना वाटत होतं, आपला हात आपल्याच तोंडांत घालावा आणि चावून चावून मोडून टाकावा !

त्यांच्यांतली सारी जाणीव जणूं चीत्कार करून रडूं बघत होती !--काय हा प्रसंग...असलं संकट कधीं आलेलं नव्हतं !

बलाई घोषही समोर नव्हते. तर्करत्नांना त्यांनीं पूजेला बसवलं आणि ते घरीं गेले. खुशाल झोंपीं गेले असावेत ते. त्यांना वाटलं असावं, आतां कांहीं काळजीचं कारण नाहीं ! तर्करत्न सिद्ध पुरुष आहेत, पंचमुंडी आसनावर बसून ते रोज कालीपूजा करतात, त्यांना गांवांतली रोगराई, आधिव्याधि यांचीं संकटं सहज दूर करतां येतील ! पण तर्करत्नांच्या समोर सर्वनाशाचं संकट उभं आहे, त्यामुळं यज्ञांत द्यावयाच्या पशूबळीप्रमाणं ते थरथर कांपत आहेत, याची कल्पना तरी त्यांना असेल का ?

तर्करत्नांच्या मनांत आलं, बलाई घोष आत्तां इथं समोर येऊन उभे राहिले तर मी त्यांना शाप देईन शाप !—पोराबाळांसह, सर्व भावी वंशजांसह, देवीच्या उदरांत जाशील असा शाप देईन मी !

झेंबतां झेंबतां काशीरामाला या वेळीं जाग आली. दचकल्यासारखं करीत त्यानं विचारलं, “ काय तर्करत्न, काय हालहवाल आहे ?”

“ अरे, कसली हालहवाल अन् कसलं काय ? हालच दिसताहेत–हवाल कांहीं नाहीं दिसत ! जें नशिबीं असेल तेंच घडेल...” आणि हें म्हणतां म्हणतां तर्करत्नांच्या आवाजांत कंप आला.

“ नैवेद्य खायला आलं नाहीं का कुणी ? ”

“ ना–हीं ! ” तर्करत्नांच्या डोळ्यांत आतां आंसवं अगदीं भरून आलीं.

“ आतां कशाला येताहेत ते ! आजकाल चंगळ आहे त्यांची. किती तरी मढीं खायला मिळतात त्यांना. तहानभुकेनं व्याकुळावं नाहीं लागत. तुमच्या त्या वाळलेल्या पोळ्या आणि त्या हाडकुळ्या बोकडाचं मास त्यांना आत्तां हवंय् थोडंच ! ”

" हरामजादा कुठला ! " तर्करत्न कडाडले, " बंद कर तुझं तोंड ! ज्यांतलं तुला कांहीं कळत नाहीं, त्याबद्दल चकार शब्दही नको बोलूस !"

"ह्यँ–ह्यँ–ह्यँ " करून काशीराम हंसला. गांजाच्या नशेमुळं त्याला भय असं कसलंच उरलं नव्हतं. "बऽरं बऽरं, मी आपला गप्प बसतों. मी बोलून चालून नंगा फकीर. वाटमाऱ्याचं भय मला कुठून ? माझं सारं देवीच्या पोटांत गेलंय्–बायको, मुलगा, मुलगी—सारीं देवीनं उचलून नेलीन् माझ्याकडून ! आतां माझं काय उरलंय् ? कसलं भय उरलंय् ?"

तर्करत्न मनांतल्या मनांत विचार करूं लागले, " खरंय् बेटा काशीराम काय म्हणतोय् तें. त्याला कसली धास्ती नाहीं, काळजी नाहीं ! पण माझं कांहीं त्याच्यासारखं नाहीं. मला घर आहे, संसार आहे, मुलंबाळं आहेत. मी मेलों, तर बायका-पोरांना खाऊं कोण घालणार ? कोणी नाहीं ! या पूजेचे तीनशें रुपये त्यांना किती दिवस जगवतील ? दुष्काळी जमाना आहे हा ! मृत्यु जणूं चहूंकडून आपले काळे काळे हात पुढं पुढं पसरीत माणसांना गट्ट करून टाकूं पाहत आहे !––सगळ्या माणसांना गट्ट केल्याखेरीज त्याची भूक भागायची नाहीं ! किती विचित्र आहे परिस्थिति ! खायला मिळालं नाहीं तर लोक मरतातच–पण मिळालं खायला तरी कॉलरा होऊन मरताहेत लोक ! आतां याहून भयंकर असं व्हायचं काय उरलं आहे ?..."

त्यांच्या समोरच कालीची मूर्ति होती. काळा कुळकुळीत रंग त्या मूर्तीचा. पण कसा चकाकणारा ! रंग ओला. त्या रंगाचे थेंब, घामाच्या थेंबासारखे, देवीच्या पायातळीं पडले. महादेवाच्या मूर्तीवर त्याचे शिंतोडे उडाले. बोलून चालून कृत्रिम मूर्ति–पण कशी जिवंत दिसते ! तिचे डोळे रक्तानं माखलेले. ही मूर्तिही सामान्य मूर्तीसारखी नव्हे. मूर्ति स्मशानांत बनवायची असते. माती घ्यायची, स्मशानांतल्या चितेंतली राख घ्यायची, कोळशाची पूड घ्यायची, त्यांची मूर्ति बनवावयाची, तिची पूजा करायची आणि रातोरात मूर्तीचं विसर्जन करून टाकायचं––असं करावं लागतं ! काशीराम कुंभारानं घाईघाईनं मूर्ति बनवली. गडबडींत ही मूर्ति देवीच्या परिचित स्वरूपासारखी घडवतां आली नाहीं त्याला. पैशाचिक सृष्टींतील बीभत्स मूर्तीसारखी बनलीय् ही मूर्ति...

तर्करत्नांनीं नदीच्या पाण्याकडे नजर टाकली. पेट्रोमॅक्सच्या प्रकाशानं देवीच्या मूर्तीची लांबच लांब छाया मूर्तीमागच्या नदीच्या पाण्यांत पडली होती. पाण्याच्या ओढीमुळं ती सांवली कांपत होती, हलत होती... सडलेल्या प्रेतांचा दुर्गंध आपला श्वास रोधून टाकीत आहे, असा भास झाला त्यांना.

काशीराम कुंभार पुनः गाढ झोंपीं गेला होता. केशव ढोलवाला ढोलावर माथा टेकून घोरत होता. तर्करत्नांना आश्चर्य वाटलं. किती निश्चितपणानं झोंपीं गेले आहेत हे !--आणि हें स्मशान ! हें स्मशान, पलीकडलं जंगल, साऱ्या दिशा-जणूं मंत्रबलानं स्तब्ध झाल्यागत दिसताहेत...कोल्ह्या-कुत्र्यांचं ओरडणंही आतां थांबलं आहे, गांवांतून रडूंही ऐकूं येण्याचं बंद झालं आहे. डोईवर आहे फक्त आकाश !

शुक्ल चतुर्दशीचं आकाश खरं, पण मेघभारानं आच्छन्न ! जणूं भीतीनंच काळवंडून गेलेलं !

हवेंत किंचित् गारवा होता. तर्करत्नांच्या अंगावर पुरेसे कपडे नव्हते. जे होते, त्यांनीं सगळं शरीर झांकतां येण्याजोगं नव्हतं. त्यांना आधींच भीति वाटत होती. भीतीनं त्यांचं शरीर थरथरूं लागलं होतं. त्यांतच हवें-तल्या गारठ्याची भर पडली. कांपऱ्या कंठानं ते मंत्र उच्चारूं लागले, देवी, प्रसीद प्र-सी-द-जय काली-जय-अंबे—!!

जवळच्याच केळीच्या पानावरला नैवेद्य थंडीनं अधिकाधिक विवर्ण होत आला होता. तर्करत्नांनीं पुनः मद्याचा एक पेला घशांत ओतून घेतला. आपलं शरीर ऊन ऊन होत आहे, जणूं पेटत आहे, असं त्यांना वाटलं ! देवी यायची नाहीं का ? येईल, खात्रीनं येईल-यावंच लागेल तिला ! आख्खं आयुष्य एकनिष्ठेनं देवीची सेवा केलीय्. सामान्य पूजाऱ्याला जिथं पाऊल टाकायला भय वाटावं, त्या तांत्रिक पंचमुंडी आसनावर बसून रोज देवीची पूजा करीत असतों मी. आणि आज देवी यायची नाहीं ? नैवेद्य घ्यायची नाहीं ? असं कसं होईल ? देवीनं माझी हाक ऐकलीच पाहिजे, ऐकलीच पाहिजे !

घड्याळाचे कांटे फिरतच आहेत. रात्रीचे तीन वाजले आहेत ! तीन ? वाजूं द्यात !...

तर्करत्न या नि असल्याच विचारांत गढून गेले. जणूं ध्यानस्थ झाले.

ते किती वेळ ध्यानमग्न होते कोण जाणे ! एकाएकीं त्यांची ध्यानसमाधि भंगली ! एकाएकीं त्यांना प्रकाश दिसला. तो प्रकाश पेट्रोमॅक्सचा होता. एकाएकीं पेट्रोमॅक्सच्या ज्वाळा भडकल्या आणि बघतां बघतां त्या विझून गेल्या नि त्याबरोबरच चोहोंकडला अंधार जणूं अधिकच वेगानं पाण्याच्या प्रचंड लोंढ्याप्रमाणं अंगावर येत आहे, असं त्यांना वाटलं. आणि हें काय ? हे तर पाण्याचें थेंब! हे कुठून येताहेत? पावसाची झिमझिम सुरू झाली वाटतं ?...

उठावं आणि दिवा पेटवावा, असं त्यांना वाटलं. पण त्या जाणीवेबरोबरच ते थक्कही झाले. त्यांच्याच्यानं उठवेना, हलवेना. त्यांना वाटलं, " प्रार्थना, मनोभावानं केलेली प्रार्थना, व्यर्थ गेली नाहीं ! देवी प्रसन्न झाली, नैवेद्य घ्यायला आली !!"

कालीमातेप्रमाणंच काळ्याभोर अंधारांतही घाबरलेल्या, रोमांचित झालेल्या नजरेनं ते पाहूं लागले. नैवेद्याच्या ढिगाऱ्यासमोर दोन डोळे निखाऱ्यासारखे तळपताहेत ! देवी दोन्ही हातांनीं गोग्रास खात आहे, नैवेद्य ग्रहण करीत आहे ! पोळ्या आणि मांस देवी चावचावून खात आहे ! त्या खाण्याचा आवाज देखील ऐकूं येत आहे !!

पण हें काय ? देवी दोन्ही हातांनीं खात आहे ? असं कसं झालं ?... तर्करत्नांना अधिकच आश्चर्य वाटलं. कोल्ह्याला हात नसतात. तर काय– तर मग–प्रत्यक्ष देवीच नैवेद्य खायला आली ? प्रत्यक्ष आली ?

भीतीनं त्यांचा श्वास रुद्ध झाला. पण त्याबरोबरच मनांतून कुठून तरी अनावर आनंदाचा पूर वाहूं लागला ! त्यांना वाटलं, आपण आयुष्यभर केलेली साधना सफल झाली, सार्थक झाली. जीवन धन्य झालं. या महास्मशानांत, मृत्यूच्या या विराट उत्सवांत देवी आपल्या खऱ्याखुऱ्या स्वरूपांत अवतरली !"

तर्करत्न आपल्या विस्फारित नेत्रांनीं टक लावून भुकेल्या भावनांनीं देवीचे डोळे किती लाल लाल झाले आहेत, तें पाहूं लागले. अंधारांत दृष्टीला निशाचरांच्या नजरेची तीक्ष्णता येते. त्यांना स्पष्ट स्पष्ट दिसूं लागलं–अस्ताव्यस्त पसरलेल्या केसांची, काळ्या कुळकुळीत अंगाची, अर्धनग्न अशी स्त्रीमूर्ति ! तिच्या दांताच्या रगाड्यांत हाडं कडकड मोडताहेत !

तर्करत्नांचं अंग शहारून आलं. डोळे मिटून घेण्याचा खूप प्रयत्न त्यांनीं केला, पण तो साधला नाहीं. कोणी तरी जबरदस्तीनं जणूं आपल्या डोळ्यांच्या पापण्या ताणून धरीत आहे, असा भास त्यांना झाला. काशीराम कुंभार आणि केशव ढोलवाला तसेच गाढ झोंपेंत आहेत. खुशाल झोंपूं द्या त्यांना, झोंपा, झोंपा लेको ! याच देहीं याच डोळां देवीला बघण्याइतकं पुण्य कुठं गांठीं बांधलंय् तुम्ही ?...

चाहोंकडे दाट काळोख पसरलेला होता. सडल्या प्रेतांचा दुर्गंध जीव गुदमरून टाकीत होता. आकाशांतून पावसाच्या सरीवर सरी अंधारांत उडया घेतच होत्या. आणि अशा वातावरणांतच तर्करत्न प्रार्थना करूं लागले, "देवी, कालीमाते, प्रसन्न हो, प्रसन्न हो ! तुझा नैवेद्य ग्रहण कर. कॉलऱ्यानं त्रासलेल्या, पीडलेल्या लोकांची राखण कर ! कालीमाते, प्रसन्न हो, प्रसन्न हो !"

भ्यालेल्या, सुकलेल्या कंठामुळं त्यांची प्रार्थना अधिकाधिक क्षीण होऊं लागली. आणि शेवटीं तर ती प्रार्थना इतकी निःशब्द झाली कीं, खुद्द तर्क-रत्नांनाच ती ऐकूं येईनाशी झाली !

घडयाळ्याच्या कांऱ्याचे ठोके पडतच होते. टिक्-टिक्-टिक्-! त्यांचे प्रतिध्वनि तर्करत्नांच्या हृदयांत उमटत होते. काळ्याकुट्ट अंधाराची भिंत भेदून काळ जणूं पुढं जाऊंच शकत नव्हता ! पावलोपावलीं जणूं त्याला थबकावं लागत होतं. त्यांतच हाडं चावून चावून फोडल्याचा आवाज कानीं येत होता. तर्करत्नांचा कंठ सुकत चालला होता. त्यांचं सारं अंग जणूं बर्फा-सारखं थंड थंड पडत चाललं होतं. त्यांच्या मनांत आलं, " आणखी एक पेलाभर मद्य घेतां आलं तर किती चांगलं होईल !" पण हलण्याची शक्तिच त्यांच्यांत उरली नव्हती. त्यांचं अंगप्रत्यंग जणूं कोणी तरी बधिर करून टाकलं होतं. हालचाल करण्याचं त्यांचं सामर्थ्य जणूं कोणी हिरावून घेतलं होतं !

इतक्यांत कोणाचं तरी विकट हंसणं ऐकूं आलं-हीः हीः हीः !

एकाएकीं या विकट हंसण्यानं सारं स्मशान थरथर कांपूं लागलं. त्या हंसण्याचा प्रतिध्वनि दिशदिशांत पसरला. नदीचं पाणी भयानं थरथरलं. नदीपल्याडल्या झाडावरून शकुन पक्ष्याचं ओरडणं ऐकूं आलं. तर्करत्नांच्या भीतीला पारावार उरला नाहीं !

काशीराम कुंभार आणि केशव ढोलवाला दोघेही एकाएकीं झोंपेंतून जागे झाले आणि ओरडत ओरडतच उठले. अमानुष भीतीमुळं मिटूं लागलेले डोळे उघडून तर्करत्नांनीं पाहिलं तों काय ! ती मूर्ति अंधारांत कुठच्या कुठं मिसळून गेली आहे, झपाट्यानं विलीयमान होत चाललेल्या तिच्या पावलांचा आवाज दुरून ऐकूं येत आहे !

ते प्रार्थना करूं लागले, ' जय माते स्मशानकाली, जय माते-" ते सारी शक्ति एकवटून ओरडूं लागले, " वाजवा रे वाजवा, आतां कुणालाही भय नाहीं ! कसलंही भय नाहीं ! खुद्द देवीच आली होती ! आली नि आपल्या वांट्याचा नैवेद्य आपल्या हातांनीं खाऊन गेली ! वाजवा, वाजवा ! जय माई स्मशानकाली !--जय माई महाकाली !" पेट्रोमॅक्सचा प्रकाश पुनः मोठा झाला. देवीनं नैवेद्याचा एवढासा अंश देखील ऊरूं दिलेला नव्हता, हें त्या प्रकाशांत तर्करत्नांच्या दृष्टीला पडलं. त्यांच्या मनांत आलं, " असं प्रत्यक्ष फळ, हातोहात पदरीं पडलेलं फळ, सहसा मिळत नसतं !"

केशव ढोलवाला प्राणपणानं ढोलकं बडवूं लागला. तर्करत्नांनीं शिल्लक उरलेली सगळीच्या सगळी दारू एका दमांत पिऊन टाकली. काशीराम नव्या दमानं गांजा ओढण्याची तयारी करूं लागला.

आतां रात्रीची पहांट व्हायला आली होती. साडेचार वाजलेले. आकाशांतले काळे काळे ढग हळू हळू पांगूं लागले होते. इतक्या वेळानंतर त्या ढगांतून मावळत्या चंद्राचा उज्ज्वल प्रकाश चोंहींकडे पसरूं लागला होता. जणूं स्मशानकाली प्रसन्न मनानं हंसत होती. मृत्यूचा बुरखा तोंडावरून बाजूस सारून येणाऱ्या पहाटेच्या आंतच या अद्भुत प्रकाराची हकीकत गांवांत घरोघर पसरली आणि मोठीच खळबळ माजली. " नैवेद्य घेण्यासाठीं स्मशानकाली जातीनं आली ! कलियुगांत देवी असा अवतार घेते हा कोण चमत्कार ! आतां भय मुळींच नाहीं ! गांवाचं रक्षण होईल, देशाचं रक्षण होईल ! महामारी राहायची नाहीं, दुष्काळ उरायचा नाहीं !" असं लोक बोलूं लागले. मृत्युमग्न गांवांत उल्हासाच्या लहरी खेळूं लागल्या. तर्करत्नांना आनंद अनावर झाला, त्यांच्या डोळ्यांतून आनंदाचीं आंसवं झरझर गळूं लागलीं. इतक्या दिवसांची आपली साधना सफळ झाली ! देवीनं प्रत्यक्ष आपणाला दर्शन दिलं ! जन्माचं सार्थक झालं ! !

शक्य तितक्या लौकर स्टेशनवर जाऊन थडकावं नि आपल्या गांवची गाडी पकडावी असं त्यांच्या मनांत होतं. पण गांवांतील लोकांनीं त्यांना जाऊं दिलं नाहीं. बलाई घोष तर सारा दिवसभर त्यांच्या चरणांवर माथा ठेऊन राहिला! लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या. तर्करत्नांच्या पावलावर मस्तक ठेऊन लोक नमस्कार घालूं लागले. या धांदलींत त्यांच्या पायाचं कातडंही निघालं! काशीराम तर घडल्या प्रकाराची हकीगत खऱ्याखोट्याची मिसळ करून, तिखट मीठ लावून जमलेल्या लोकांत पसरवीत होता!

"कालीमातेचं दर्शन घेण्याइतकं पुण्य माझ्या पदरीं कुठून असायला? म्हणून तर या पापी डोळ्यांवर त्या वेळीं मोहाच्या झोंपेनं पगडा बसविला! सारी लीला कालीमातेचीच! चोंहोंकडे अंधार मी मी म्हणत होता. त्या मिट्ट काळोखांत प्रत्यक्ष कालीमाय आली आणि आपल्या हातांनीं तिनं नैवेद्य संपवून टाकला! तिच्या गळ्यांत मुंडमाळा होत्या, हातांत खड्ग होतं, जिभेवरनं टप् टप् टप् टप् रक्त गळत होतं! आणि त्यांत देवीचं तें हंसणं! ऐकलं असतंत तुम्ही तर—पोटांतलीं आंतडीं एकामागून एक तटातट तुटून गेलीं असतीं! त्या हंसण्यानंच मी जागा झालों—आणि—"

भीतीनं गांगरलेल्या, आश्चर्यानं थक्क झालेल्या, सभोंवतालच्या लोकांवर एक नजर फेंकून काशीराम सांगूं लागला, "मी जागा झालों–आणि टक लावून बघतच राहिलों!"

संध्याकाळनंतर तर्करत्न बैलगाडींतून स्टेशनकडे निघाले. त्यांना मध्यरात्रीची गाडी गांठायची होती. आणि त्यानंतर शहर गांठायचं!

गाडींतली अर्धी अधिक जागा मिळालेल्या दक्षिणेनं आणि लोकांनीं दिलेल्या दाणावाणांनीं भरून गेली होती. केळीं, नारळ, धोतरं नि उपरणीं, खण नि लुगडीं. तांदूळ, गहूं, आणि फळं! हळदी कुंकवाच्या पुड्या! बलाई घोष अशा बाबतींत कधीं कंजूषपणा करीत नसे. धान्याचा व्यवसाय करून त्यानं चिकार पैसा मिळविला होता या वर्षी. शिवाय हा गांव तालुकदारांचा आणि सावकारांचा. युद्धाच्या बाजारांत सर्वांनीं आपापली तुंबडी भरली होती, खोऱ्यानं रुपये सांठवले होते. पूजेबद्दल दक्षिणा ठरली होती तीनशें रुपये; पण त्याऐवजीं मिळाली पांचशें! ती हातांत पडली तेव्हां

तर्करत्नांनीं पोटभर आशीर्वाद दिला. एका कालीपूजेची पांचशें रुपये दक्षिणा ! काय चमत्कार ! युद्धामुळं देशाचा व्यापार–व्यवसाय वाढला नसता तर तर्करत्नांच्या मनांत आलं–तर पांचशें रुपये दक्षिणा स्वप्नांत तरी कुणाला मिळाली असती का ?

अत्यंत प्रसन्न मनानं तर्करत्नांनीं विडी शिलगावली. धुंद मनानं त्यांनीं झुरके मारायला सुरुवात केली.

गाडी मंथर गतीनं चालली होती.

आज कोजागरी पौर्णिमा ! संध्येच्या आगमनाबरोबरच सारं आकाश उजळीत पूर्णचंद्र आकाशांत आला. साऱ्या ऐश्वर्यानं मिरवूं लागला. कालचं मेघाच्छादित आकाश नि आजचं हें निरभ्र आकाश किती अंतर ! तर्क-रत्नांच्या मनांत आलं, आज शहरभर लक्ष्मीपूजनं चालू असतील. मोठी गर्दी उसळली असेल. माझ्या किती तरी पूजा बुडाल्या, दक्षिणा बुडाल्या ! बुडूंद्यात. त्या पूजांनीं जेवढी दक्षिणा मिळाली असती, त्याच्या किती तरी पटीनं बलाई घोषनं दक्षिणा दिली मला. कालीची कृपा ! देवी त्याचं भलं करो !

दुतर्फा लांबच लांब माळ पसरलेला होता. शेतं पसरलेलीं होतीं. पौर्णि-मेच्या चांदण्यानं दशदिशा न्हाऊन निघाल्या होत्या ! त्या चांदण्यांत शेतांतलीं पिकं किती उमाप आलींयत. मधून मधून एखादा तालवृक्ष पहारेकऱ्यासारखा उभा असलेला दिसे. रस्त्याच्या दोहों बाजूंस मल्लिकेच्या फुलांनीं जणूं आपल्या सुगंधाची माया विस्तारली होती. अधून मधून छोटीं छोटीं गांवं. इतकं पीक–या उजळलेल्या जीवनांत आपल्या दुष्काळाचा स्पर्श करूनही मृत्यु निःस्तब्ध दिसत होता.

तर्करत्न खुषींत होते. तोंच गाडीवानानं आपल्या बैलांना शिव्या हांस-डीत चाबकानं मारीत गाडी थांबवली.

" काय झालं रे ?"

तर्करत्नांची सुखसमाधि खाडकन् उतरली ! त्यांना आश्चर्य वाटलं, भय वाटलं. या निर्जन माळावर चोर, दरोडेखोर आले कीं काय ? आतां काय होणार ? हे पांचशें रुपये, हीं दानं, वाणं—

" बाबू, रस्त्यावर डोंबवस्तींतली वेडी आडवी पडली आहे !"

" कुठली वेडी ? कुठल्या डोंबवस्तींतली ? काय झालंय् तिला ? "

" अहो--ती वेडी " गाडीवानाच्या आवाजांतली वेदना तर्करत्नांना जाणवली. " दुष्काळांत तिचीं तीन मुलं अन्न अन्न करीत मेलीं! तिचा घरधनी देखील तडफडत तडफडत मेला ! तेव्हांपासून तिला वेड लागलंय्. रस्त्यांत आडवी पडलीय्. कण्हते आहे बिचारी. बहुधा यमानं आपले पाश आंवळलेले दिसतात तिच्याभोंवतीं ! "

तर्करत्नांना भीतीनं कांपरं भरलं. त्यांनीं गाडींतल्या गाडींत अंथरुणांत आपलं डोकं लपवलं. डोकं वर न करतांच ते गाडीवानाला म्हणाले, " असूं दे, असूं दे ! गाडी बाजूनं हांक ! हांक लवकर ! तिला कसला रोग झाला असेल कोण जाणे, चल चल, चल बाबा लौकर--! "

गाडी चालूं लागली. कोजागरी पौर्णिमेची ज्योत्स्ना साऱ्या ऐश्वर्यानं विलसूं लागली होती. संताळ वस्तींतून सनयांचा मृदुगंभीर स्वर ऐकूं येत होता. संताळही लक्ष्मीपूजेंत दंग आहेत कीं काय ? कोजागरी ? लक्ष्मी घरोघर येते आणि हांक देते, को-जाग-री ? कोण जागें आहे हो ? चांदण्याच्या दुधानं धान्यपिकांचे चेहरे टवटवीत झाले होते. पिकानं [illegible]न गेलेल्या शेतांत अधून मधूनच दीपशिखा दिसत होत्या.

पृथ्वीवरलीं माणसं शस्यलक्ष्मीला आवाहन करीत होतीं. तिच्या पावलांचा स्पर्श झाला कीं शेतांतल्या धान्याचं सोनं होऊन जाईल ! तर्करत्नांच्या मनांत आलं, " मल्लिकेच्या सुगंधांत लक्ष्मीमातेच्या सौंदर्यपूर्ण अंगाचा सुगंध मिसळलेला असावा बहुतेक !"

तर्करत्नांचं मन एकाएकीं विव्हल झालं. दोन्ही हात मस्तकाकडे नेऊन तें गद्गद् कंठानं म्हणूं लागलं, " जय स्मशानकाली ! कृपा कर माते ! रोगराई नाहींशी कर, माणसांचं रक्षण कर ! जय महाकाली ! तूं महालक्ष्मीचं रूप घेऊन ये आणि सर्वांना दर्शन दे !"

इतकं धान्य आहे, इतकीं पिकं आलीं आहेत, दुष्काळ टळेलच टळेल, यांत शंका कसली ?

—पण एक गोष्ट मात्र तर्करत्नांना उमगली नाहीं. त्यांची स्मशानकाली या डोंबवस्तींतल्या वेडीच्याच रूपानं आली होती नैवेद्य खायला—आणि अजूनही ती रस्त्यावरल्या धुळींत मृत्यूच्या यातनांमुळं तडफडत तडफडत पडली आहे !—कालीप्रमाणंच जीभ बाहेर काढून घोंटभर पाण्याखातर ती उसासे टाकीत आहे, तळमळत आहे ! तिचे प्राण कंठाशीं आले आहेत. पुष्कळ दिवसांच्या भुकेनंतर देवभोग्य शिवाभोग, तो नैवेद्य तिनं खाल्ला खरा, पण तो तिला पचला नाहीं—तिच्याच्यानं सहन करवला नाहीं !

आणि तरीही टळेल ! महामारीचं आणि दुष्काळाचं सारं विष नीलकंठाप्रमाणं या वेडीसारखे दरिद्री, भुकेले लोकच पिऊन टाकीत असतात !

लोखंडी फाटकाच्या पलीकडे दोन भयंकर कुत्रे उभे होते. ज्या नजरेनें ते माझ्याकडे पाहत होते, ती नजर स्नेहवाचक नव्हती. त्या नजरेमुळेंच एक पाऊल पुढें टाकून तीन पावलें मागें सरलों मी !

फाटकाबाहेर अनिश्चित मनःस्थितींत अंमळ उभा राहिलों. मनांत आलें, 'असेंच परतायचें का ? शामबाजारपासून इतक्या दूरपर्यंत पैसे खर्चून आलों आणि आतां फक्त या दोन कुत्र्यांचें नुसतें दर्शन घेऊनच परत जायचें ?'

रायबहादुर एच्. एल्. चटर्जी-त्यांचेंच हें घर. पण हांक कोणाला मारायची ? दरवानाची खोली बंद होती. पलीकडे बागेंत ग्रँडी फ्लोरा फुलून आला होता. जवळपास हातांत झारी घेऊन माळी कामांत गर्क होता. माझ्याकडे त्याचें लक्ष गेलें कीं नाहीं कुणास ठाऊक ! नसेल गेलें, तर तें अगदीं स्वाभाविक आहे.

पण करणार काय ? नोकरीच्या शोधासाठीं खेटा घालणारा उमेदवार मी. मोठ्या परिश्रमानें एक परिचयपत्र मिळविलें. रायबहादुर हे माझ्या वडलांचे स्नेही हें ऐकून माहित होतें.

रायबहादुर मनांत आणतील तर नुसत्या लेखणीच्या फटकाऱ्यासरशीं सहज नोकरी देऊं शकतील. असेंच इथें उभें राहावें झालें. कुणाचें तरी माझ्याकडे लक्ष वेधेल, लौकर वेधेल. त्या शुभ क्षणाची प्रतीक्षा करीत बसणेंच चांगलें !

फाटकासमोर येरझाऱ्या घालीत राहिलों. रासबिहारी ॲव्हेन्यू येथून तेथपर्यंत पसरलेला. मोटरी, ट्रॅम्स, माणसें यांचा अविरत, अविच्छिन्न स्रोत रात्रंदिवस वाहतो इथें. माथ्यावर विमानांच्या पंख्यांचा आवाज. जपानी दुष्मनांचें आक्रमण होईल कीं काय अशा शंकेनें विमानें पहारा करीत होतीं. सिंहाला पंख असतात हेंच खरें !

घुर्रऽऽऽ !

मागून कुत्र्याची क्रुद्ध गर्जना ऐकूं आली. चपापून मागें पाहिलें. भल्या मोठ्या कुत्र्याची स्वारी अगदीं गेटपर्यंत येऊन पोंचली. स्वारीनें लोखंडी रेलिंगमधून आपलें मोठें चपटें शेंबडें नाक बाहेर काढलें. दोन डोळ्यांत जणूं सोनेरी आग झळाळत होती. गिनीच्या नव्या, झगझगीत नाण्यासारखे चमकत होते ते डोळे ! दांत बाहेर काढीत तो पुन्हां म्हणाला, घुर्र ऽऽऽ

लक्षण कांहीं ठीक दिसत नव्हतें. आपल्या शास्त्रकारांनीं 'शकठं पंचहस्तेन' हें वचन लिहून ठेवलें, तेव्हां कुत्र्याचा महिमा त्यांना कळलेला नसावा बहुतेक. मी आणखी दोन पावलें मागें सरलों. आशा सोडवत नव्हती. उमेदवाराच्या आशेला अंत नसतो हेंच खरें !

किंचित् अंतरावर "मनोहर कुकर पार्क.' हा पार्क कांहीं खरोखरीचा मनोहर राहिलेला नाहीं. भुके-बंगाल लोकांची कॉलनी वसली आहे तिथें. हे भुके बंगाल—म्हणजे कलकत्ता नगरीच्या निर्मल स्फटिकवत् जलांत पुराच्या लोंढ्यांतून वाहून आलेली घाणच होती जणूं ! लेकाचे आरडतात, ओरडतात, भांडतात, झगडतात. परस्परांचे केंस ओढतात. जनावरांसारखे आपल्या काळ्या काळ्या जिभांनीं हायड्रेनचें घाणेरडें पाणी पीत असतात. त्यांच्याबद्दल सहानुभूति वाटत नाहीं. वेदना वाटत नाहीं ! एका अहेतुक आशंकेनें मन थरारून जातें. अंगावर कांटे उभे राहतात. उभ्या देशभर क्षुधेनें कालीमातेप्रमाणें जीभ बाहेर काढली आहे. भुकेची ही आग केव्हां शमणार कोण जाणे ? मूठभर भात, पसाभर बाजरी एवढी पुरी होते का यांना ? छे, याहून जास्त, आणखी जास्त !! या रासबिहारी ॲव्हेन्यूमधील टोलेजंग बरांइतकें अन्न हवें यांना.

वाऱ्याच्या झोतासरशीं गंध दरवळला. बुभुक्षितांच्या अंगाचा दुर्गंध नव्हता तो. ग्रँडी फ्लोराचा उग्र मधुर गंध ! डोळ्यांसमोर अस्फाल्टचा रुंद रस्ता, काळ्या मार्बलच्या पायऱ्या. रंगीत कांचा लावलेल्या खिडक्यांवर रेशमी पडदे आणि चिनी मातीच्या टबमध्यें हेलावणारा ऑर्चिड.

"कोण हंवय् आपल्याला ?" गोड, मधुर कंठस्वर मॅग्नोलियाच्या सुगंधाशीं या स्वराचें जवळचें नातें असलें पाहिजे खास !

चपापून पाहिलें. फाटकापलीकडे कुठून तरी एक षोडशी येऊन उभी राहिलेली. निरोगी, भरल्या अंगाची, गोरी गोरी पान ! हातांत सायकल, पायांत ट्राउझर्स.

तिनें पुन्हां विचारलें, " काय हवंय् आपल्याला ?–मेल्या, गप बैस कीं जरा. "

गुरगुरणें बंद करून कुत्रा शांतपणें उभा राहिला. तरुणीच्या चेहऱ्याकडे तोंड करून प्रसादाकांक्षी माणसासारखा शेपटी हलवूं लागला.

घाबरत, चांचरत, शुष्क स्वरांत मीं विचारलें, " रायबहादुर आहेत का ?"

" बाबा ? हो, आहेत ना."

" त्यांची भेट होईल का ? "

" या ना आंत."

लोखंडी फाटक खुलें झालें. अस्फाल्टच्या रस्त्यानें मला आमंत्रण दिलें. रस्ता कसा परीटघडीसारखा स्वच्छ ! ठिगळें लावलेल्या माझ्या पादत्राणांपेक्षां किती तरी सुंदर ! !

हिरवा पडदा बाजूस सारून आंतल्या कार्पेटवर पाऊल टाकलें. दिवाणखान्यांत निळ्या निळ्या रंगानें आपला स्निग्ध प्रकाश पसरलेला होता. एक गृहस्थ अर्धवट पडल्या पडल्या कांहीं वाचत होता. मी आंत आलेला पाहतांच तो उठून बसला.

रीतसर नमस्कार चमत्कार झाला. नंतर ते म्हणाले, " बसा. काय पाहिजे आपल्याला ?"

धडधडत्या अंतःकरणानें ओळखपत्र त्यांच्या हातीं दिलें नी खुर्चीवर बसलों.

रायबहादुरांनीं लिफाफा फोडून पत्र वाचायला सुरुवात केली. आणि मी मधून मधून भित्र्या नजरेनें त्यांच्याकडे पाहूं लागलों. वाटोळा चेहरा, पांढऱ्या टुकटुकीत त्वचेंतून रक्तकणिंका जणूं बाहेर फुटूं पाहत होत्या. ब्लडप्रेशरची डॉक्टरी व्याख्या काय आहे कोण जाणे. पण रक्ताधिक्य असा त्याचा अर्थ असेल, तर रायबहादुर ब्लडप्रेशरनें आजारी असले पाहिजेत याबद्दल बिलकुल शंका उरली नाहीं मला !

कांहीं क्षण असेच निःस्तब्धावस्थेंत गेले. कोठें तरी घड्याळाची टक् टक् ऐकूं येत होती. वाऱ्याच्या झुळुकेसरशीं रायबहादुरांच्या किमानतोचा हात फडफडत होता. अन् त्यांच्या डाव्या हाताच्या बोटांत हें काय झळाळत आहे ?–हिरा ? हो, हिराच !

चिठी वाचून झाल्यानंतर रायबहादुरांनीं माझ्या चेहऱ्याकडे पाहिलें. त्यांची नजर शांत नि उदार दिसली. सुप्त मनांतून जणूं आश्वासन मिळालें, "मिळेलहि तुला नोकरी कदाचित् !"

" अरे, वाः ! प्रमथचा मुलगा ना तूं ? अरे, म्हणजे तूं आमच्यांतलाच, आमचाच ! तुझे वडील नि मी फरीदपूरच्या मिशन स्कुलांत बरोबरच शिकलों. प्रमथ ! ओ ! ही वॉज ए नाइस बॉय !"

मी विनयानें मान खालीं घालून पाहत राहिलों !

" तुझ्या वडिलांनीं राजिनामा दिला तेव्हां ती बातमी मला कळली होती. ते लहानपणापासूनच मोठे स्पिरिटेड. अन्याय त्यांना बिलकुल सहन होत नसे. तो सहायची शक्ति असती, तर अशा फुकाफुकी नोकरी सोडली नसती त्यांनीं. ॲन एक्सेप्शनल बॉय ही वॉज !"

निरुत्तर राहण्यावांचून मला काय करतां आलें असतें ? वडिलांची स्तुति ऐकून आज्ञाधारक भक्त मुलांनीं विनीत होणेंच उचित !

" मग काय ? या युद्धाच्या बाजारांत नोकरी नाहीं मिळत ? एम्. ए. पास होऊनहि कारकुनीसाठीं उमेदवारीच चालवलीस् ? बी ए मॅन, यंग फ्रेंड ! साहस कर. ॲडव्हेंचरसाठीं बाहेर पड ! ॲक्टिव्ह सर्व्हिसमध्यें नोकरी पत्कर, नेव्हीमध्यें उडी टाक !"

मीं म्हटलें, " इतक्या सहाजासहजीं नाहीं तें साधत ! किती तरी अडचणी आहेत. किती तरी लोकांना भेटावं लागतं. शिवाय अशा अनिश्चित अवस्थेंत..."

" अनिश्चित ? " रायबहादुरांची नजर तीक्ष्ण झाली. " मुला, हें जीवनच मुळीं अनिश्चित आहे ! या अनिश्चिततेंतच मींहि एक दिवस उडी टाकली होती, आणि प्रवाहासंगतीं वाहत सोडलें होतें स्वतःला ! सिंगापुरांत दहा वर्षे काढलीं. हवाई, मॅनिला, ताहिती, फिलिपाइन इत्यादि ठिकाणीं

भटकत राहिलों. मिकाडोच्या देशांत जपानमध्यें भटकत राहिलों ! जगाकडे उघडया डोळ्यांनीं पाहिल्यावांचून जगण्याला कांहीं अर्थच नाहीं उरत !"

"खरं आहे !" मी मोठया कष्टानें हंसलों !

रायबहादुरांच म्हणणें किती चांगलें, किती मूल्यवान् ! ॲड्व्हेंचर नाहीं म्हणूनच बंगाल्यांची सारी प्रतिभा व्यर्थ होऊन बसली ! पण भली गोष्ट कळल्यानेंच भलें होतां येतें का ? युद्धाचें भय वाटतें मला. सायरन ऐकतांच माझ्या छातींत धडकी भरते, थरथर कांपूं लागतों मी. यू बोटींचीं विघ्नें असलेल्या फेनिल समुद्रांत निरुद्देश यात्रा करणें–माझ्या कविकल्पनेला मानवत नाहीं ! शिवाय परंपरागत अर्थानें प्रशान्त महासागराच्या स्वप्न-राज्यांत वाहत वाहत, तरंगत तरंगत फिरणें–आणि बॉम्बफेक्या गरुडांच्या मृत्युचंचूखालीं दुर्बिणीच्या शोणित नजरेनें पाहत, ॲंटी–एअर–क्राफ्ट घेऊन प्रतीक्षा करीत राहणें या दोहोंत किती विलक्षण अंतर आहे !

रायबहादुर पाइप पेटवून म्हणाले, "किती तरी ठिकाणीं भटकून आलोंय् मी ! हवाईतील ते हुला-हुला डान्स, स्टीव्हन्सन–व्हॅलेन्टाइनचा प्रवालद्वीपांचा देश, फिलिपाइनमधील जादुविद्या–सारं सारं पाहिलं आहे ! माझ्या संग्रहांत साऱ्या ठिकाणच्या अजब अजब चिजा भरल्या आहेत ! पाह्यच्या आहेत ?"

त्यांचें 'कलेक्शन' पाहण्याच्या मनःस्थितींत मी मुळींच नव्हतों ! पंचवीस रुपयांची खासगी शिकवणी आहे. तिच्यासाठीं आत्तां निघालें पाहिजे; पण रायबहादुर वडिलांचे स्नेही. त्यांना अप्रसन्न करून कसें चालेल ? त्यांच्या लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं मिळून जाईल नोकरी !

रायबहादुर उठले ! झगझगीत प्रकाशाचा एक दिवा त्यांनीं लावला. नंतर एका कोंपऱ्यांतील लोखंडी कपाट त्यांनीं उघडलें. त्याच्या खणातून काळ्या व्हेल्व्हेटची एक बॉक्स बाहेर काढली व आणून ठेवली माझ्यासमोर ! झांकण उघडून ते म्हणाले, "पाहिलंस ?"

पाहिलें मीं. पण हें कसलें कलेक्शन ! लहानमोठया हाडांचे तुकडे नुसते ! प्रत्येक हाडाला एकेक नंबराचें लेबल लावलेलें. मी थक्कच झालों ! म्हटलें, "हाडंच नव्हेत का हीं ?"

"हो, हाडंच !" माझ्यासमोर बसत रायबहादुर म्हणाले, "हाडं खरीं, पण अशीं तशीं नव्हेत ! सामान्य हाडं नव्हेत ! त्यांच्यापैकीं प्रत्येकाला मोठा

इतिहास आहे, त्यांच्यांत सारे अमानुष गुण आहेत ! सारे पॅसिफिक प्रदेश फिरून जमवलीं आहेत हीं हाडं ! पण–वन् मिनिट प्लीज. सुशी, डीअर–"

सुशी दिवाणखान्यांत आली. मघांचीच ती पोर !

" बोलावलंत् पपा ?"

" हो. आम्हाला चहा हवाय्. "

" सांगतें हं–" नाचाच्या थाटांत आपली तनुलतिका हलवीत हलवीत सुशी बाहेर गेली.

रायबहादुरांनीं आतां पुनः माझ्याकडे नजर लावली. नंतर एकादा मूल्यवान हिरा उचलावा तितक्या हलक्या हातानें त्यांनीं पेटीमधील एक हाड बाहेर काढलें.

" कोणाचं हाड हें सांगतां येईल तुला ?"

कोणा तरी भयंकर प्राण्याचेंच तें हाड असलें पाहिजे यांत संशय नव्हता ! घाबऱ्या घाबऱ्या मीं म्हटलें, "गोरिलाचं ?"

" नॉन्सेन्स ! " रायबहादुरांनीं चांगलाच धक्का दिला मला ! "प्रशांत महासागरांत गोरिला राहतात हें कधीं ऐकलंय्स तूं ? अरे, ऱ्होडेशियनाचं हाड हें. "

" ऱ्होडेशियन ?"

" हो, ऱ्होडेशियन ! " रायबहादुर नाराज झाले आहेत हें उघड दिसत होतें ! " ऱ्होडेशियनाचं नांव नाहीं माहित ? तो अर्ध माणूस, अर्ध गोरिला कांहीं शतकांपूर्वीच त्याचं अस्तित्व होतं या पृथ्वीवर !"

मीं वेडपटासारखें म्हटलें, " हो, हो, माहित आहे न् काय ! " मनांत मात्र हा निव्वळ मूर्खपणा आहे असें वाटलें. पण करणार काय ? उमेदवारी करायची तर हा मूर्खपणा करायलाच हवा !

"हें हाड देखील ऱ्होडेशियन वर्गातल्याच कोणाचं तरी आहे ! माणसाचंही असेल कदाचित ! तें कुठं मिळालं, आहे ठाऊक ? मिंडानोव बेटांत काटाबाटू नांवाची एक जागा आहे. त्या गांवाजवळच्याच एका सरदाराकडून हें विकत घेतलं ! किती रुपये दिले सांगतां येईल का ? "

रायबहादुरांकडून पुनः एकदां फटकारा मिळेल या भयानें स्पष्ट उत्तर द्यायचें साहस झालें नाहीं ! " पुष्कळच द्यावे लागले असतील ! "

" हो ! पांच हजार रुपये पडले ! "

" पांऽऽच हज्जार ! " रायबहादुरांच्या हातांतील त्या वस्तूकडे मी स्तंभित दृष्टीनें पाहतच राहिलों ! तीन इंच लांब, चन्द्राच्या आकाराचें, सुरीच्या पात्यासारखें तें हाड ! विवर्ण झाल्यामुळें पिवळट रंग चढलेला—रायबहादुरांच्या विशालकाय कुत्र्यांच्या तीक्ष्ण दातांच्यासारखा !

" ही किंमत खूप वाटते ? छे: ! मुळींच नाहीं. त्याचा इतिहास ऐकशील तूं तर—"

दुरून भांडणाचा आवाज ऐकूं आला. त्या आवाजांत त्यांचे पुढील शब्द ऐकूंच आले नाहींत ! बाहेरल्या रस्त्यावर ट्रामचा खडखडाट, दिवाणखान्यांतील घड्याळाची टिक्‌टिक् असा छंदोबद्ध स्वरझंकार—या साऱ्यांना दूर सारून तो भांडणाचा कर्कश कोलाहलच कानावर येऊन आदळूं लागला ! पण हा कोलाहल अपरिचित नव्हता. कोणत्या तरी कारणानें भुकेल्या जनतेचा समुद्र खवळलेला असला पाहिजे !

रायबहादुरांच्या चेहऱ्यावर असमाधान पसरलें. " पार्कमधल्या त्या डेस्टिटयूटांच्या गोंगाटानं अलीकडे रात्रीची झोंप देखील येईनाशी झाली आहे. खायला-प्यायला कांहीं मिळालेलं दिसतं, म्हणूनच हा कोलाहल ! खायला मिळालं नाहीं तरी ओरडा, मिळालं, तरीही ओरडाच !"

हिरवा पडदा बाजूस सारून नोकर ट्रे घेऊन आला. चहा, फराळ ! वडिलांशीं असलेली मैत्री रायबहादुरांनीं खरोखरीनें मनांत वागविली आहेसें दिसतें ! आपली वारी फुकट नाहीं जायची—नोकरी मिळेलच बहुधा !

रायबहादुर म्हणाले, " घे ना ! "

मी निमूटपणें एक प्लेट जवळ ओढली. भूकहि विलक्षण लागली होती. अकरा वाजतांच मेसमधून जेवून बाहेर पडलों होतों. आतां साडेपांच वाजून गेले ! एवढ्या वेळांत चहाचा एक घोंटही घेतला नाहीं, एक सिगरेटहि ओढली नाहीं !

दुरून पुन्हां बुभुक्षितांचा चीत्कार ऐकूं आला. केरकचऱ्याचीं कुंडें उपडीं पाडून कुत्रे जसे चीत्कार करून भांडूं लागतात, तसा हा ओरडा ऐकूं येत होता. माझ्या मनःचक्षूंसमोर स्पष्ट दृश्य दिसत होतें. पोट पाठीस गेलेले ते बुभुक्षित जनावरासारखें मिळेल तें बकाबका तोंडांत भरीत आहेत.

खिचडीचे घांस घश्यांत अडकून सर्वांचे डोळे जणूं बाहेर पडूं पाहत आहेत आणि तरी देखील आणखी अन्न मिळतें म्हणून अवरुद्ध स्वरानें ते असे नाद करताहेत. तिथें ते आणि इथें आम्ही ! इथें किती मापूनतोलून संयतपणानें, सभ्यपणानें आम्ही चहा पीत आहोंत. तोंड पाव इंच उघडून दातांनीं केक चावीत आहों. हेतु जणूं खाण्याचा नसून गवताचें टोंक चिरडण्यासारखी दातांची फक्त चाळवाचाळव करणें हा ! नुसते जिभेचे चोचले पुरविणें हा! चहाच्या पेल्यांत तोंड बुडवावयाचें तें इतक्या नाजुकपणानें कीं, किंचित् देखील आवाज होणार नाहीं, नुसत्या ओंठांनीं एकाद्या तरुणीचें अलगद चुंबन घ्यावें त्यांतलाच हा प्रकार ! गपागप खाणें, गळा मोठा करून बोलणें—छेः ! जीवनाचा सारा ‘ इस्थेटिक ’ आनंद नाहींसा होतो त्यामुळें !

ओठाजवळचा चहाचा पेला खालीं ठेवून रायबहादुर म्हणाले, “ काय सांगत होतों मी ? हं, आठवलं. हें हाड मोठ्या प्रयासानं हस्तगत केलं. तिथला सरदार हें हाड आपल्या मुगुटांत मिरवीत असे. ज्याच्या मस्तकीं हें हाड राहील तो युद्धांत अजेय होईल, शत्रूंनीं शस्त्रांनीं हजारों आघात केले तरी त्याला कसलाही अपाय व्हायचा नाहीं. त्यांच्यांत एक जादुगार होता. त्यानं हें हाड मंत्रून दिलं होतं. क्युरिओचा एक अजब नमुना म्हणून महत् प्रयासानं हें हाड मीं हस्तगत केलं. वेल् यंग मॅन, जादुविद्येवर विश्वास आहे का तुझा ?”

खोलींत संध्या अधिकाधिक दाटत चालली होती. मनोहर कपूर पार्क-मधून बुभुक्षितांचा ओरडा अविच्छिन्न ऐकूं येत होता. जादुविद्येवर विश्वास ? हो, विश्वास न धरून कसें चालणार ? आमचा हा बंगाल म्हणजे शस्य-श्यामल लक्ष्मीचें भांडार ! हरिवर्म देव, शशीक प्रभृति सम्राटांच्या तरवा-रींनीं तळपलेला हा आमचा देश. त्याच आमच्या बंगालमधून प्रेतांच्या या झुंडीच्या झुंडी उठताहेत ! त्या कोणाच्या मंत्रबलानें ? शेतें पिकांनीं समृद्ध होतीं, पण तीं शेतें आज उजाड बनलीं. धान्याचा एक कणदेखील दृष्टीस पडत नाहीं हा चमत्कार कसा झाला ? कोणी जादुगारानें केला ? जादुविद्येवर विश्वास ठेवण्यावांचून गत्यंतर आहे का ?

मीं म्हटलें, “ हो. जादूसारखे भासणारे पुष्कळसे प्रकार दिसतात. विज्ञानानं त्यांचं...”

" There you are !" नंबर दोनचें हाड पेटींतून हातांत घेऊन रायबहादुर म्हणाले, " मी दिखील तेंच म्हणतों. स्टिव्हन्सनच्या त्या साऱ्या गोष्टी वाचल्या आहेस ना तूं? बघतां बघतां साडे तीन हाताचा माणूस साडेतीनशें हात उंच होतो. लांब लांब पावलं टाकीत समुद्र ओलांडून जातो. त्याच्या त्या उद्दाम पावलांखालीं पाण्याच्या तळाशीं असलेले नाविकांचे सारे सांगाडे चूर चूर होऊन जातात. ताहितीच्या आकाशांत झडीचे काळे मेघ अगदीं रक्तासारखे लाल होतात. क्षुब्ध वाऱ्यासंगतीं अग्निज्वाला फैलावूं लागतात. आकाशांतून वर्षाव होतो तो जलबिंदूंचा नव्हे, तर रक्तबिंदूंचा— ताज्या ताज्या रक्तबिंदूंचा!! आणि हें सारं कोणाच्या प्रभावानं होतं? असल्याच...असल्याच एका हाडाच्या प्रभावानं!"

भयभीत, शंकित दृष्टीनें मीं त्या हाडाकडे पाहिलें. एरवीं या साऱ्या गोष्टी म्हणजे गांजेकसानें तारेंत बनविलेल्या गोष्टी असे मला वाटलें असतें. पण माझ्या भोंवतालचें सारें वातावरण याच कहाणीसाठीं जणूं तयार होऊन बसलें होतें. दिवाणखान्यात झगझगीत विद्युत्दीप जळत होते. ग्रँडी फ्लोरा आणि रायबहादुरांच्या पाइपमधून कडक तंबाखूचा गंध वातावरणांत मिसळत होता.

खिडक्यांचे निळे पडदे वाऱ्याच्या झोतासरशीं प्रशांत महासागराच्या निळ्या निळ्या जललहरींसारखे हेलावत होते. समोर बसलेले रायबहादूर म्हणजे त्या अपरिचित प्रदेशांतील अद्भुतकर्मा जादुगार! त्यांच्या हातांतलें हाड केव्हां पेट घेईल आणि चमत्कार घडवून आणील याचा अगदीं नेम नाहीं!

रायबहादुर पुढें बोलूं लागले, " तिथले लोक खग्रास चंद्रग्रहणाच्या वेळीं कुमारीची पूजा करतात. नंतर तिचा बळी देतात. त्यानंतर तिला जाळून टाकतात. मग जीं हाडं उरतात तीं जमिनींत गाडून टाकतात. सात वर्षं संपलीं म्हणजे मोठ्या थाटामाटानं वाजतगाजत जमिनींत गाडलेलीं तीं हाडं बाहेर काढतात. मिरवीत मिरवीत समुद्राकडे नेतात आणि समुद्रांत फेकून देतात. लगोलग समुद्रांत उडी टाकून समुद्राच्या तळाशीं जाऊन जो हाडं बाहेर आणतो, तो जादुविद्येचा मालिक होतो. सारे प्रेतात्मे त्याचे चाकर बनतात. मनांत येईल तें तो त्यांच्याकडून करवून घेऊं शकतो.

मोठमोठाल्या दगडांचं त्याला सोनं करतां येतं. त्याचा आदेश मिळाला कीं वेली, झाडंही अजगर, साप होऊन फणा वर काढतात...".

मी मंत्रमुग्ध झाल्यासारखा बसून राहिलों. रायबहादुरांचे दोन्ही डोळे खदिरांगारासारखे लाल झाले होते. जणूं जळतच होते ते ! त्यांच्या हातांतल्या अंगठींतला हिरा जळत होता. बळी दिलेल्या कुमारीचीं हाडें जळत होतीं. निळे पडदे जळत होते आणि जळत होते तीव्र शक्तीचे विद्युत्‌दीप ! मला भास झाला सारा दिवाणखानाच जळतो आहे !! त्या जळत्या जागेंत मॅग्नोलियाचा वास, पाइपांतील तंबाखूचा वास, व्हेल्वेट बॉक्समधून बाहेर पडणारा औषधी वास मिसळून जात आहे. वाटलें, माझ्यासमोर जणूं एक अग्निकुंड धगधगतें आहे. धगधगणाऱ्या आगींत कच्चें मांस जळत आहे. जळत्या मांसाचा आणि केसांचा उग्र दुर्गंध धुराबरोबरच बाहेर पडत आहे. मग...मग माझा श्वास कोंडूं लागला आहे !

रायबहादुरांनीं आपल्या मुलीला फर्मावलें, "बाळ, फॅन सुरू कर पाहूं जरा."

भासाची धुंदी ताबडतोब उतरली. माणसें जळताहेत, पण तीं ताहिती बेटांत नाहीं. जळताहेत इथें, या कलकत्त्यांत ! भुकेच्या वळवळत्या शिखांत ! रासबिहारी ॲव्हेन्यूमध्यें लोकांची वाहनांची सारखी रीघ लागली आहे. ट्रॅम्स धांवताहेत, मोटरी धांवताहेत. स्त्री-पुरुष, लहानथोर धांवताहेत. अविराम गोंगाट चालू आहे. पण, या सर्वांचा भेद करून भुकेल्यांचा तो ओरडा कानावर आघात करतो आहे. काय तो त्यांच्या गळ्याचा अस्वाभाविक जोर ! मानवांचा दानवी आर्त नाद ! मरण्याआधीं माणसाच्या गळ्याचा स्वर असाच गगनभेदी होत असतो का ?

रायबहादुरांनीं त्रासून कपाळाला आंठ्या घातल्या. भुकेल्यांचा तो आर्त नाद त्यांच्याही कानीं येत होता, धक्के देत होता. तो किती प्रत्यक्ष, किती वास्तव ! माणसाची भूक अगदीं नंगी असते. क्षणभरांत ती विसरतां येत नाहीं. ती टाळण्याचा उपाय कोठेंही सांपडत नाहीं. कोठें ताहिती, मॅनिला, होनोलुलू या प्रदेशांतलें जादूचें राज्य आणि कोठें...

पण माझ्या मनांत रायबहादुरांच्या दरवाजांतलें तें भयंकर कुत्रें उभें राहिलें. नव्या गिनीसारख्या झगझगणाऱ्या पिंगळ्या डोळ्यांनीं तें पहारा

देत आहे. त्याचा तो कडक पहारा चुकवून या राज्यांत अनाहूत, अनधिकार पाऊल टाकण्याचें धाडस कोणासहि व्हायचें नाहीं. रायबहादुरांचा हा बंगला म्हणजे जादुमंत्राचा देश ! बाहेरच्या जगांत भुकेचा कितीहि नंगा नाच चाललेला असो, इथल्या फुलांचा रंग, रायबहादुरांच्या हातांत चमकणारे हिरे, किंवा निळ्या पडद्यांच्या अंगावरला विद्युत् प्रकाश यांच्यांत कांहींहि फरक पडायचा नाहीं !

"हीं हाडें किती प्रयासानें मिळविलीं आहेत मीं ! या कलेक्शनमधल्या प्रत्येक हाडाच्या अंगीं असेच गुण आहेत. पॅसिफिकमध्यें हिंडतांना असलीं हाडं गोळा करणं हाच माझा छंद होता. या हाडांबद्दलच एक ग्रंथ लिहावा असा विचार करतों आहें मी."

मला कसेंसेंच वाटूं लागलें. नाकांत एक विलक्षण, अमानुष दुर्गंध घुसत आहे--आगीचा दुर्गंध, करपल्या-जळल्या मांसाचा दुर्गंध ! इथून पळालों तरच निभाव आहे ! पण नोकरी ? रायबहादुरांच्या लेखणीच्या चार ओळी नोकरी देतील मला.

"हाड मिळवलं पण मंत्र मिळवतां आला नाहीं. अनधिकारी माणसाला तो मंत्र शिकवत नसतात ते. जर का तो मंत्र मिळाला असता तर--" रायबहादुर हंसून म्हणाले, "-तर इतक्या दिवसांत किती अघटित करणी करून टाकली असती मीं कोण जाणे ! कदाचित् मंत्रबलानं साऱ्या जगाचं स्वरूपच बदलून टाकलं असतं. हा छोटा दांत पाहिलास. हा दांत..."

अस्थिराज्यांतून मुक्ति मिळाली तेव्हां रात्रीचे नऊ वाजायला आले होते !

अखेरीस रायबहादुर म्हणाले, "Young man, पन्नास साठ रुपड्यांच्या नोकरीसाठीं कशाला जिवाचा आटापिटा करतोस ? Be courageous ! धिटाईनं नशीब काढण्यासाठीं बाहेर पड. 'ॲक्टिव्ह सर्व्हिस' मध्यें नांव नोंदव. तुझ्यासमोर समुद्र पसरला आहे, पृथ्वी पसरली आहे. कारकुनी करून काय मिळणार ?"

क्लांत, निराश, भरलेल्या गळ्यानें मीं म्हटलें, "तें खरं आहे. पण नोकरी मिळाली तर--"

"नोकरी, नोकरी, नोकरी ! त्या नोकरीपायींच देश रसातळाला गेला. तूं प्रमथचा मुलगा आहेस. तुझे वडील What a splendid boy he

was ! वडिलांचं नांव राखलं पाहिजे. लेखणी झिजवायच्या नोकरींत तुझं सारं भवितव्य नाहींसं नको करून टाकूंस ! I wish you all success! अच्छा, Good-night ! ”

“ नमस्कार.”

ब्लॅक-आउटची वेळ. रस्त्यावर अंधार पसरलेला. उपदेशाचें ओझें माथ्यावर घेऊन जड पावलांनीं पुढें चाललों. आजची शिकवणी बुडाली. शिकवणीचे पैसे बुडाले. विद्यार्थ्याचे वडील पिढीजात सावकार. फुकाची एक पैहि खर्चायचे नाहींत कधीं ! एक दिवसाचा पगार ते कापून घेणार यांत शंकाच नाहीं.

समोर Dust bin जवळच्याच्च झांकण लावलेल्या लॅम्पपोस्टमधून त्या डस्टबिनवर प्रकाश पडला होता. त्या उकिरड्यांत सांगाड्यासारखीं दिसणारीं, माणुसकीला आंचवलेलीं तीन चार माणसें कांहीं खायला मिळतें कीं काय हें शोधीत होतीं. जवळच सारीं हाडें बाहेर आलेली कुत्र्याची छायामूर्ति आपल्या या नव्या प्रतिस्पर्ध्यांशीं सामना करतां येणार नाहीं अशा जाणीवेनें तो कुत्रा उभा होता. हातापायाच्या काड्या झालेल्या, पोट बलूनसारखें फुगलेलें, एक पोर दोन्ही हातांनीं कांहीं तरी तोंडांत धरून चोखीत होतें. काय चोखीत होतें तें ? हाड; हो, हाडच्च !

मी थबकून उभा राहिलों. चटकन् मनांत एक कल्पना चमकून गेली. तें हाड आणि ज्याचें वर्णन रायबहादुरांनीं केलें तें हाड या दोहोंत कांहीं तरी साम्य आहे. तें हाड बळी झालेल्या कुमारीच्या त्या हाडासारखें दिसतें आहे. त्या हाडाच्या प्रभावानें ताहितीच्या आकाशांत रक्ताळलेले ढग गर्दी करतात, वादळासंगतींच आगीच्या ज्वाळा पसरतात, आणि ते ढग ताज्या रक्ताची झड सुरू करतात. कलकत्त्याच्या आकाशांत ढग गर्दी करताहेत का ? आकाशांतील चांदण्यादेखील नीटशा दिसत नाहींत. केव्हां या काळ्या आकाशाचा रंग अग्नीसारखा लाल होणार ? मॅग्नोलियाच्या सुगंधानें सुरभित झालेल्या या गोड वातावरणांत झडलेल्या अग्नीच्या झुळका केव्हां थैमान घालणार ?

त्यांना हाडें मिळालीं आहेत. फक्त मंत्र मिळायचा अवकाश आहे !

जवळूनच एक एकाक्ष टॅक्सी भरधांव गेली. तिचा तो एक डोळादिखील काळ्या कागदानें झांकलेला होता! त्याच्यावर पावसाचे थेंब जमले होते. त्या टॅक्सीची नजर, पाण्यांत बुडलेल्या माणसाच्या नजरेसारखी दिसत होती. चितपूरच्या अंधाऱ्या रस्त्याच्या दोहों बाजूंस स्प्रेनें फवारे उडवावेत तसे चिखलाचे फवारे उडवीत ती टॅक्सी निघून गेली.

स्वतःला शक्य तितकें सांवरून मी उभा होतों. पण मोटरनें उडविलेला चिखल बॉम्बच्या स्प्लिंटर्सहूनही द्रुतगामी आणि दूरगामी! फाटकातुटका रेनकोटही चिखलाच्या शिंतोड्यांनीं न्हाऊन निघाला याची मला स्पष्ट जाणीव झाली.

जानेवारी महिन्यांतली थंडीनें कांकडवून टाकणारी रात्र. आहिरीतोळा ओलांडून गंगेवरली हवा भणभण करीत येत होती. त्या हवेंत आणखी कांहींही असो, जननी जान्हवीच्या प्रेमळपणाचा यत्किंचितहि आभास तींत नव्हता एवढें मात्र खरें. थंडीनें हात, पाय, चेहरा फाटून तुकडे तुकडे होणार असें वाटत होतें. बाहेरल्या थंडीशीं चढाओढ करीत, पोटांत भुकेची आग धगधगत होती.

अतिपूर्वेकडे जपानी बॉम्ब अवतरले होते. सायगव रेडिओवरून आशियाच्या कल्याणाबद्दल अतिमानव शुभेच्छा व्यक्त करीत होते. जपानी बेटांत पीतवर्ण कल्कीचा अवतार झालेला होता!

कलकत्त्यांत ब्लॅक आउट! रस्त्यावरले दिवे अजूनहि मालवलेले नव्हते. दिव्यांभोंवतीं गुंडाळलेल्या काळ्या बुरख्यांआडून येणारा प्रकाश असाहाय्य पादचाऱ्यांना चकवीत व चुकवीत होता.—त्यांची दिशाभूल मात्र करीत होता! आणि कलकत्त्याच्या रोगट आकाशांतून काळ्या वृष्टीच्या धारा रस्त्यावर

कोसळत होत्या. या चितपूर रोडला नरकाच्या पितृत्वावर हक्क सांगतां आला असता; पण अंधारांत रस्त्यावरल्या चिखलाचें स्वरूप दिसत नव्हतें हीच त्यांतल्या त्यांत समाधानाची बाब !

पण करणार काय ? थंडीच्या या रात्रीं अंधारांत रस्तोरस्तीं भटकायचें तर मला बर्फासारखें गोठून जायला तयार राहिलेंच पाहिजे. पण तसें करून चालणार नाहीं. निदान आज रात्रीं तरी मुळींच चालणार नाहीं. पार्टीचे महत्त्वाचे कागदपत्र माझ्याकडे आहेत. ठरल्या ठिकाणीं ते पोहोंचवीपर्यंत मी जिवंत राहिलेंच पाहिजे. पोलिसांच्या जागृत, सावध नजरेपासून स्वतःला वांचविलेंच पाहिजे.

ठण्– असा घड्याळांत एक ठोका पडला. किती वाजले कोण जाणे ! कदाचित् साडेबारा वाजले असतील. कदाचित् दीडहि वाजला असेल.

कलकत्त्याच्या या घाणेरड्या वस्तींत किती अद्‌भुत स्तब्धता आहे ! पूर्वी या वस्तींत रात्रभर विलास नांदे, उल्हास नांदे, व्यापारी संस्कृतीचा सारा रानटीपणा, सारा हिडीसपणा या ठिकाणीं मोकाट नंगा नाच करी. पण जपानी बॉम्बच्या आसन्नगर्जनेनें माणसांची पशुत्वाची दिशाही रोधून टाकली आहे काय ? मृत्युलोकांत सत्ययुग खरोखरीच अवतरलें आहे काय ?

दुरून शिटीचा कर्कश आवाज ऐकूं आला. बुटाच्या खाड् खाड् आवाजानें इथून टालीगंजपर्यंतचा रस्ता दुमदुमवीत कोणी तरी पुढें पुढें येत आहे. पोलिसाखेरीज अशा उन्मत्तपणानें पावलें टाकीत, कोणाला भटकतां येणार ?

जर का त्याची–माझी नजरानजर झाली, तर मग आटोपलाच कारभार ! सुटण्याची आशाच नको पोलिसांच्या तावडींतून. लाल बाजारच्या पोलिस-ठाण्यांतच मधुयामिनी घालवावी लागेल; पण माझी मनःस्थिति अशा प्रियसंगमाला अनुकूल नव्हती; म्हणून विजेच्या गतीनें मी नजीकच्याच गल्लींत शिरलों.

वाः ! काय चमत्कार ! उजवीकडे, डावीकडे, पायातळीं जमिनीवर आणि माथ्यावर आकाशांत आदिसृष्टींतील आदि अंधार पसरलेला ! ही गल्ली जन्मभरांत प्रकाशाचें तोंड कधीं पाहील अशी आशा पट्टीच्या आशावाद्यालाही बाळगतां आली नसती ! वाईटांत चांगलें एकच होतें.

काळे बुरखे पांघरलेल्या त्या दिव्यासारखी फसवणूक तरी होत नव्हती. स्वतःला रात्रीच्या दयेच्या पदरांत निश्चितपणें सोडून देतां येतें इथें ! कांहीं काळ इथें सहज लपून असतां येईल !

पण वेळ जातां जाईना. दिवसभरांत पोटांत कांहींच गेलें नव्हतें. विलक्षण थकव्यामुळें शरीर जमिनीवर कोसळून पडूं पाहत होतें. असह्य थंडीमुळें हाडांनीं जणूं एक विलक्षण नाचच सुरू केला होता. चेहऱ्यावर सुईच्या टोंकासारखे पावसाचे थेंब पडत होते. माझ्या मनांत आलें, " या थंडीमुळें माझ्या पायांचीं बोटं एकामागून एक गळून पडणार असतील कदाचित् ! "

पण मला जगलेंच पाहिजे, अवश्य जगलें पाहिजे, या गोष्टीचा विसर कांहीं केल्या पडत नव्हता ! या वेळीं या निद्रित नगरींत, घरोघरीं ऊबदार अंथरुणावर, ऊबदार पांघरुणांत झोंपून, स्त्रीशरीराच्या उबेत, पूर्णोदर माणसें स्वप्न पाहत असतील कदाचित् ! नियमित चाकरी, निभृत निवासस्थान, निश्चित प्रेम ! बाहेर अंधाऱ्या काळ्या रात्रीत कलंकित, दुष्ट, रक्ताला चटावलेली देवता आपले सहस्र बाहू पसरून भटकत फिरत आहे ! आणि–आणि नव्या प्रभातींचा नवसूर्य कुठें तरी अंधारांत कदाचित् तारवटलेल्या डोळ्यांनीं जागून वेळ काढीत असेल !

खोक् खोक् खोक्...खोक् खोक्...खोक्...जवळच्या घरांतून कोणी तरी खोकत होतें. त्याचें हें खोकणें बराच वेळ चाललें होतें. एकसारखें खोकणें ...मनाला थोडा संदेह उत्पन्न झाला. वाटलें, ऊबदार घरांत नुसती प्रेमाची मदिरताच नांदत नसते तर ! थंडीनें कांकडून गेलेल्या रात्रीच्या राजपथावर मृत्यूची भीषण छायाही फिरत असते ! अंधारांत धडपड धडपड करीत बराच पुढें येऊन पोंचलों. एक रिकामी जागा दिसली. माथ्यावर छप्पर, उभें राहायला, बसायला थोडीशी सुकी जागा ! विचार केला, " पुढचं पुढं पाहूं–आजची रात्र तरी निभावेल !"

विजेचा स्पर्श व्हावा तसें मला झालें आणि मीं ताड्कन् उडी मारली. माझ्या पायतळीं माणसाचें शरीर लागलें. वाटलें, " मुडदा–बिडदा तर नाहीं ना ?"

पण माझी दुष्ट शंका दूर करून तो मनुष्यच ओरडला, "कां रे बाबा, थेट अंगावर पाय देऊनच चाललायस कीं ! शुद्ध–बिद्ध आहे कीं नाहीं धड ?"

" माफ कर हं बाबा ! अंधारांत दिसलं नाहीं !"

माझ्या या विनयपूर्वक बोलण्यानें स्वारी खूष झालेली दिसली.

" कोणाचा, कितीचा माल गपापा केलास, बाबा ?"

दुःखद स्थितींतही मला हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. म्हटलें, " माल गपापा करायला पैसा कुठला ? उधार देतोस का ?"

अंधारांतच तो कर्कशपणें हंसला. " वा: ! मोठा रसिकच दिसतोस कीं ! बैस, बैस दोस्त, विडीचे झुरके मारूं आपण !"

" थंडीनं गारठून गेलोंय् बघ. बसलों तर उठवायचं नाहीं माझ्याच्यानं !"

" थंडीनं गारठून चाललास ?" त्याच्या स्वरांत सहानुभूति होती. " अरे, आधींच कां नाहीं सांगितलंस ?...बैस ना या चुल्ह्यांत. अजून चांगली गरम आहे ती भट्टी !"

" भट्टी ?" मीं चकित होऊन विचारलें.

" हो हो, भट्टी ! चटपट शीर त्या भट्टींत. नाहीं तर आणखी एखादा यायचा नि बळकावून बसायचा ! तो भडभुंजा मध्यरात्रीपर्यंत जिलब्या तळत असतो, म्हणून बरं ! ऊब तरी मिळते आमच्यासारख्यांना !"

आतां कुठें डोक्यांत चक्क प्रकाश पडला. रस्त्यालगतचें उपाहारगृह होतें तें. त्या चुलींतच माणसें उबेसाठीं या हिंवाळ्यांत आसरा घेतात ! 'नरेंचि केला हीन किती नर !'...मारवाड्यांना लोकांची दयामाया असते हें कबूल केलेंच पाहिजे. या चुलींत ते जास्त कोळसे घालतात ते यासाठींच का ? तुपांत चरबी मिसळतात, मैद्यांत सोपस्टोन मिसळतात; मोहरीच्या तेलांत भलतेंच कसलें तरी तेल मिसळतात, पण धर्मशाळा बांधतात, दानधर्म करतात, त्यांत मात्र भेसळ करीत नाहींत !

सहज आकाशाकडे नजर गेली. धनदाट ढगांनीं आणि निद्रित नगरीच्या विषाक्त निःश्वासांनीं तें ग्रॅनाइटसारखें कठीण दिसत होतें. अंगावरली फाटकी चादर भिजून गेलेली, पाय जणूं लांकडासारखे झालेले आणि समोर चुलीचा लोभनीय आसरा... वाटलें, निखाऱ्यांच्या उबेंत रात्र बघतां बघतां संपेल ! आतां तर समोरच्या रस्त्यावर बुटांचा आवाज ऐकूं येऊं लागला !

ढकलले दोन्ही पाय त्या प्रचंड चुलींत. कमरेपर्यंत आंत गेलों. आंतली राख उडून अंगावर येत होती. दोन चार ठिणग्याही अंगाला चाटून गेल्या. पण बाहेरल्या असह्य थंडींत या ठिणग्यादेखील स्वर्गसुखासारख्याच भासल्या!

"शिरलास ना आंत? बस. ठीक ठीक! आतां विडी शिलगाव म्हणजे झालं!"

त्यानें घस् करून काडी ओढली. तिच्या प्रकाशांत त्याचा चेहरा नजरेला पडला. माथ्यावर धुळीनें माखलेल्या केसांच्या जटा वाढल्यागत झालेल्या! चेहऱ्यावर व्रण असतील. नाकावर कसलीशी जखम; त्यामुळें नाक गळून पडेलसें वाटत होतें. नाकाची जखम...कसली बरें असेल ती? ओंठ फाटलेले. त्यांच्या फटींतून दोन मोठाले किडके दांत बाहेर आलेले दिसले!

त्यानें एक विडी माझ्याकडे सरकावली. "नंबर वन्‌ची आहे,—चालेल ना?"

'नंबर वन्' हा खुणेचा शब्द! तीही विडीच; पण तंबाखूची नव्हे,—गांजाची! मी उत्तरलों, "अं–हं! मला नाहीं चालायची!"

"हात् तुझी! किती अरसिक आहेस, दोस्त! नुसती बाटलीच रिकामी करायला शिकलायस् वाटतं!"

मी निमूटपणें राहिलों. छातीशीं पार्टीचे कागदपत्र खस–खस करीत होते. बेकायदेशीर रीत्या छापलेलीं पत्रकें होतीं तीं! त्यांत लिहिलेलें होतें,—"जगांतील वंचित कामगारांनो, उठा, जागे व्हा! हातोडया उचला आणि भांडवलशाहीचा चेंदामेंदा करून मातींत मिसळून टाका तिला! उठा, हातापायांतल्या शृंखलांखेरीज गमावण्याजोगें तुमच्यापाशीं कांहींच नाहीं!..."

टिप् टिप् करीत पावसाचे तुषार अंगा-तोंडावर येत होते. गांजाचा धूर आणि सडलेल्या जखमेचा दुर्गंध श्वास रोधून टाकीत होते. सोबत्याचा संसर्ग लोभनीय वाटत नव्हता. जनतेचें–गणदेवतेचें–स्वरूप असेंच किळसवाणें असतें काय?

"अरे यार, कसं होणार तुझं? तूं निशापाणी करीत नाहींस, भांगगांजा पीत नाहींस. तुझ्या चेहऱ्यावरनंच दिसतंय् तें! पोलिसच्या भीतीनं पळून तर नाहीं ना चाललास?"

"तसं म्हणा हवं तर!"

" ठीक ! ठीक ! उत्तम ! " तो खूष होऊन म्हणाला, " काय केलंस ? खून ? चोरी ? कीं एखाद्या बाईच्या अंगावर हात टाकलास कुठं ?...इथं चूपचाप पडून राहा कसा. इथं कोणी नाहीं यायचं. थंडीच्या कडाक्याच्या या रात्रीं तुला शोधून काढणं कुठल्या बेऱ्याला साधणार ?--अं ?"

वेळ तसाच रेंगाळत चालला होता.

फूटपाथवर डोकं सांवरून, हात दुमडून झोंपलों होतों. वातावरणांत हिम पसरलेलें होतें. त्याच्या आक्रमणापासून रक्षण करण्यासाठीं कानावरून मीं माझी फाटकी चादर लपेटून घेतली. पलीकडल्या दूरच्या त्या घरांतून त्या दमेकऱ्याच्या खोकल्याचा आवाज मात्र मधूनमधून ऐकूं येत होता.

टिप्–टिप–टप्–टप्–टप्...पावसाचे मोठाले थेंब पडण्यास आतां सुरुवात झाली होती. चोहोंकडून चिखलाचे थेंब अंगावर उसळत होते. बघतां बघतां जोराच्या सरी कोसळूं लागल्या.

माझा सोबती, पाठीवर मार बसलेल्या कुत्र्यासारखा कण्हूं लागला.

त्या चुल्यांतून मीं दोन्ही पाय बाहेर काढले. अशा असाहाय्यपणानें भिजत राहून चालायचें नाहीं ! नुसता माझाच प्रश्न असता, तर हरकत नव्हती; पण तीं पत्रकें नि ते कागदपत्र यांचा बचाव केलाच पाहिजे !...पण ही रात्र तरी केव्हां संपणार ! निद्रित कलकत्त्यावर हा भयाण अंधार पसरलेला.–जणूं किती तरी युगांपासून दाटत आलेला हा अंधार–हलायचा नाहीं–टळायचा नाहीं ! संध्येचा छद्मवेष धारण करून मृत्यूनेंच जणूं ही महानगरी गिळून टाकली आहे ! महानगरीची ही झोंप–ही अंतिम झोंप आहे ! या झोंपेंतून ही नगरी पुन्हा जागीच व्हायची नाहीं !

किती अमानुष अंधार ! हरक्षणीं एक विचित्र भय शरीराच्या कणाकणांत शिरत होतें. डाव्या पायाचा अंगठा थंडीच्या तीव्रतेनें दुखूं लागला होता.

इतक्यांत अकस्मात् आकाशांत वीज चमकली. विजेची ती तीक्ष्ण शिखा एखाद्या भयंकर सापासारखी दिक्-दिगंतांत क्षणभराचा खेळ करून नाहींशी झाली !! प्रेतराज्यासारखी काळ्याकुट्ट अंधारांत बुडून गेलेली गल्ली तेवढ्या क्षणांत मायापुरीसारखी उजळली. वज्राच्या गर्जनेनें दोहों बाजूंचीं घरें थरथर कांपूं लागलीं. आणि मुसळधार पाऊस कोसळूं लागला !

विजेच्या त्या प्रकाशांत समोरच्या घराच्या ओस्यावर कोणी तरी उभें असलेलें दिसलें. एवढया रात्रीं, असल्या या गल्लींत, अजूनहि माणूस उभ्या उभ्या जागूं शकतो का ? अशा वेळीं कुणी कुणाची वाट पाहत उभें राहतें का ?

छेः ! विचार करीत राहायला वेळच नव्हता. कपडयांवरलें पाणी उराशीं धरलेल्या कागदपत्रांना भिजवूं लागलें होतें. मी विद्युत् वेगानें उठलों आणि तडक त्या घराकडे निघालों !

फिक्कट हिरव्या रंगाचा स्कार्फ गुंडाळलेली, फिक्कट चेहऱ्याची एक बाई तिथें उभी होती. तिनें " या या, या ना आंतमध्यें," असें म्हणून मला निमंत्रण दिलें. तिच्या चेहऱ्यावर पावडरीचे थर दिसत होते !

मी क्षणाचाही विलंब न लावतां आंत शिरलों.

त्या स्त्रीनें दरवाजा बंद केला आणि ती माझ्यासमोर येऊन उभी राहिली. दिव्याच्या प्रकाशांत मला पूर्णपणें पाहायची संधि तिला आतां लाभली होती. कमरेपर्यंत त्या चुलींतली राख अंगाला नि कपडयांना लागलेली. अंगावरली चादर भिजून ओली ओली चिंब झालेली !

तिचें आधींच निस्तेज असलेलें मुख अधिकच निस्तेज झालें—काळवंडलें. माझा एकंदर रागरंग पाहूनच, जन्मजात संस्कारांच्या जोरावर, मी तिचें गिऱ्हाईक नाहीं हें तिनें ताडलें होतें !

" काय हवंय् तुम्हांला ?" तिनें विचारलें.

तिला उत्तर न देतां मीं एकवार चोहोंकडे पाहून घेतलें. या खोलींत खाट नाहीं. एका बाजूस दोन ट्रंका, किरकोळ सामानसुमान, फाटकें, मळकें लुगडें ! जमिनीवर एक गादी पसरलेली. तेथें एक पांढरा तक्क्या ठेवलेला. एक हार्मोनियम ठेवलेला. खोलीच्या एका कोंपऱ्यांत तबला व पायांतले चाळ !

मीं कांहीं न बोलतां बसकण घेतली. माझ्याच्यानें उभें राहवत नव्हतें. या खोलींत स्निग्ध ऊब आहे,—चुलींतली चटके देणारी उष्णता नाहीं याची जाणीव मला झाली. थंडीनें शरीर कुडकुडत होतें. मनांत येत होतें, हें शरीर अलगद त्या बिछान्यावर पसरून द्यावें.

तिच्यानेंहि कांहीं बोलवत नव्हतें असें दिसलें. ती दिसायला काळी, कुरूप ! तिची तिशी बहुधा उलटून गेलेली दिसत होती. कदाचित् त्याहूनहि अधिक

वय असेल तिचें. कामप्रेरणा कितीहि अनावर झालेली असली, तरी कोणी पुरुष या बाईला आपली शृंगारनायिका करूं शकेल हा विचारच अशक्य वाटत होता. तिच्या चेहऱ्यावर थोड्याफार सुरकुत्या पडल्या होत्या, काळेपण पसरलेलें होतें. असंख्य सर्पांच्या गतिरेखांसारख्या दिसत होत्या त्या सुरकुत्या. "तुला काय हवं आहे ?" माझ्याकडे जिज्ञासु, भ्यालेल्या नजरेनें पाहत तिनें विचारलें.

रात्रीचे सारेच पाहुणे तिच्या पायाशीं प्रणयाचें अर्घ्य अर्पण करण्यासाठींच येत नसत. कित्येक 'पिण्या'साठीं ! मद्याच्या प्याल्यांत नजर चुकवून स्ट्रिकनिनच्या गोळ्या टाकत, नशा चढली कीं हाताला लागेल तें बगलेंत मारून तिथून बेपत्ता होत. अविश्वास आणि अपमृत्यु यांच्या दरम्यान त्यांचें जीवन हेलकावे खायचें,–आळवावरील पाण्यासारखें !

"कांहीं नको आहे ! नुसता आसरा हवा आहे थोडा वेळ !" मी सांगितलें.

"आसरा ?"–तिचे दोन्ही ओंठ थरथरूं लागले. "फरारी आहेस ? पळून चालला आहेस वाटतं ?"

मी नुसता हंसलों.

"काय केलंस ?"

"विशेष कांहीं नाहीं ! कांहीं कागदपत्र आहेत माझ्याबरोबर. गुन्हा एवढाच. दुसरा कोणताहि गुन्हा नाहीं केलेला !"

पाहतां पाहतां तिचें तोंड उजळलें; प्रसन्न झालें. तिच्या मनांतील संशय फिटला. गाढ सहानुभूतीनें तिच्या डोळ्यांत पाणी खळखळलें.

"तूं स्वदेशी,–स्वराज्यी आहेस ?"

"होय,–बराचसा !"

"अग बाई ! थंडी किती चावरी ! वेळ रात्रीची. तूं भल्या घरांतला दिसतोस;–पण असा वेड्यासारखा कां फिरतोस ? अंगांत गरम कोट नाहीं, कांहीं नाहीं––"

मीं मध्येंच म्हटलें, " करणार काय ? रात्रीं दहाच्या सुमाराला पोलिसांनीं घरावर छापा घातला, झडती घ्यायला सुरुवात केली ! परड्यांतली भिंत ओलांडली नि पडलों झालं बाहेर."

ती गाढ उत्कंठेनें व स्नेहाच्या स्वरांत म्हणाली, " अरे, अरे ! मग या बिछान्यावरच आराम कर बघूं ! हें घे पांघरूण ! कसलंच भय नको बाळगूं ! "

" अन् तूं ? " मीं विचारलें.

" माझी नको तुला काळजी ! "

खरेंच ! तिची काळजी करून मला काय करतां येणार ? या क्षणीं मला ऊबदार पांघरूण हवें. विसांवा हवा. मला जगलें पाहिजे, स्वतःचा बचाव केला पाहिजे. निदान उद्यां सकाळपर्यंत तरी या कागदपत्रांची जबाबदारी संभाळलीच पाहिजे. माझ्या जीवनाचें आज मोल आहे तें माझ्याच दृष्टीनें नव्हे; बहुजनांसाठीं, बृहत्तर जगासाठीं, अवघ्या जगासाठीं माझें जिणें मोलाचें आहे !

पांघरूणाचें आकर्षण वाढत होतें. वाटलें, एकदां का त्याच्या कोमल स्निग्ध आलिंगनांत बांधून घेतलें कीं उद्यां सकाळीं आठ वाजायच्या आधीं झोंपमोड व्हायची नाहीं ! उभ्या शरीरांत जणूं शताब्दीची तन्द्रा आणि क्लान्ति भंगून पडली आहे ! या वेश्येच्या खोलींत, असंख्य व्यभिचारांच्या स्मृतिकंटकित शय्येंत, उज्ज्वल प्रकाशांत देखील आसरा घेण्याच्या विचारानें मन कसें संकोचतें ! पण बाहेर पाऊस पडत आहे. आज या वेळीं साऱ्या गोष्टींचा अर्थ बदलला आहे ! निशीथनगरीचें हें भीतीनें भेसूर झालेलें स्वरूप ! श्वास कोंडून टाकणाऱ्या अपमृत्यूसारखा हा अंधार ! हजारों शतकें जो गुप्त रोग विषमय होऊन बसला होता तो आज उघड झाला आहे ! यांतच आज सभोंवतालचें जग जणूं उजळून निघालें,–त्याचें सत्यस्वरूप, मूळ स्वरूप, अविकृतपणानें व्यक्त झालें आहे ! प्रकाश, प्रसाधनें, आणि ऐश्वर्य यांच्या पडद्याआडचा रूपजीवि नगरीचा खरा चेहरा आज उघडकीस आला आहे !

" हं, विचार कसला करतोस ? अंथरुणावर निज तूं खुशाल. आमच्या बिछान्यावर अंग टाकायची कदाचित् शिसारी येईल तुला—पण फूटपाथपेक्षां किंवा मिठाईवाल्याच्या चुलीपेक्षां हें अंथरूण कांहीं वाईट नाहीं हें मात्र नक्कीच ! "

ती बिछान्याच्या एका कडेस येऊन बसली. तिच्या फिक्कट, काळवंडून गेलेल्या चेहऱ्यावर मूर्तिमंत दारिद्र्य प्रगटलें होतें. तिच्या चेहऱ्यावर, तिच्या

डोळ्यांत भूक होती—ती अन्नाची ! मदिराक्षी वारवधूंचे हास्य–विभ्रम त्या चेहऱ्यावर नव्हते.

मीं तिच्याकडे पाहिलें आणि मी चमकलों ! वाटलें, स्नेहानें आणि करुणेनें तिचे दीप्तिहीन डोळे आंसवांनीं तरारून आले आहेत.

पण—मनांतल्या या सर्व भावनांवर वीज चमकून गेली. वाटलें, 'ही स्वार्थपरताच नाहीं तर काय ! आज रात्रीं गिऱ्हाइक मिळालें नाहीं बिचारीला, तर उद्यां कदाचित् उपवास करावा लागेल !' खोलींत चोहींकडे कंदिलाच्या मिणमिणत्या प्रकाशांत दारिद्र्य भरून राहिलेलें दिसत होतें; त्याची नग्न रिक्तता माझ्यावर जणूं आघात करूं लागली. या ठिकाणीं रात्र घालवणें म्हणजे तिच्या तोंडचा घांस काढून घेणें !

बाहेर पाऊस थांबला होता. थकलेभागलेले, शिणलेले, उठण्यास नाराज असलेले पाय मीं मोठ्या कष्टानें एकत्र केले आणि उठून उभा राहिलों. पण माझ्या आश्रयदात्रीनें मला हटकलें, "हें काय ? उठलाससा ?"

"अं हं ! मला निघालंच पाहिजे आतां. तुझे उपकार मी केव्हांहि विसरणार नाहीं." असें म्हणून मी शिणल्या पायांनीं बाहेर आलों.

छातीशीं असलेल्या पत्रकांनीं, कागदपत्रांनीं खसखस केली !

"असं काय हो ? या रात्रीं, थंडींत, नाहीं गेलां तर नाहीं का चालणार ?" तिनें बाहेर येऊन विचारलें.

मागें वळून, तिच्याकडे पाहून हंसण्याचा प्रयत्न करावा लागला. म्हटलें, "सांपडलों पुनः संकटांत तर पुनः येईन इथंच !"

दरवाजाचा पडदा बाजूला सारून स्निग्ध नजरेनें पाहत असलेली ती वेश्या एखाद्या पुतळ्यासारखी उभी आहे असें दृश्य मला दिसलें. घरांतून निरोप घेण्याच्या वेळीं माझी बहीण कितीदां तरी दरवाजांत अशीच उभी राही नि भरल्या डोळ्यांनीं मला निरोप देई, त्याची मला आठवण झाली.

पुनः तोच तो काळोख. तीच ती गल्लींतली वाट ! बाहेरल्या बर्फिल रात्रीच्या तावडींतून कांहीं क्षण पळ काढून मीं त्या घरांत आसरा घेतला होता. पण आतां—? पळून जाणारी शिकार पुनः मुठींत गवसली असें पाहून थंडगार वारा जणूं अधिकच निष्ठुरपणानें चावे घेऊं लागला. कानाच्या पाळ्यांत दोन बर्फाचे तुकडे ठाणें मांडून बसल्याचा भास होत

होता. नाकामधून रक्त गळण्यास सुरुवात झाली होती. डाव्या पायाचा अंगठाही असह्य वेदना देत होता.

आकाशांत दोन तारे दिसूं लागले होते. ते चकाकणारे नव्हते. धूसर मेघांनीं आणि धुक्यानें त्यांना झांकून टाकलें होतें.

बाजूस नजर गेली. लोखंडी रेलिंग असलेल्या एका विस्तीर्ण बंगल्या-समोर कारंज्यांतून थुई थुई पाणी पडत होतें. गेटापाशीं शेड लावलेला दिवा. त्या दिव्याच्या अस्पष्ट प्रकाशांत कारंजाजवळ व्हीनसची एक नग्न मूर्ति दिसली. तिची आबाळ केल्यामुळें तिच्या सर्वांगावर निळ्या शेवाळाचा थर चढलेला दिसत होता. या अंधाऱ्या गल्लींत अंधारानें माखलेलें हें सौंदर्यहीन घर,–किती समसमां संयोग !

समोर एक मोठा रस्ता. बहुधा शोभा-बाजार स्ट्रीटच असावा ! मोठ-मोठाल्या घरांनीं अंधाराच्या जणूं काळ्या भिंतीच उभ्या केलेल्या होत्या.

पावसानें भिजून गेलेला प्रशस्त रस्ता क्षीण प्रकाशांत चकाकत होता.

झण–झण–झण–झण–झण असा आवाज अकस्मात् कानीं येऊन आदळला. क्षणार्धांत एका विचित्र शंकेनें, भीतीनें शरीरावर कांटा उभा राहिला. निद्रित कलकत्त्याच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत तो आवाज निनादत गेला असावा !

माझी नजर निशाचरासारखी तीक्ष्ण झाली होती. टक लावून पाहिलें. वाटलें होतें, तसा रोमांचकारी प्रकार नव्हता ! तीन चार कुत्रीं एकाच वेळीं डस्टबीनचा आसरा घेऊं पाहत असावींत. त्यांच्या त्या प्रयत्नामुळेंच डस्ट-बीन उलटून पडली ! तिच्यामधून, त्या रस्त्यावरून दोन तीन मोठाले प्राणी धांवत धांवत गेले ते थेट ड्रेनेजच्या सांदींत ! उंदीर होते ते.

दूर चितपूर रोडवरून एक मोटर ग्रे स्ट्रीट ओलांडून गेली. कदाचित् डॉक्टरची मोटर असेल. कदाचित् सोनागाछी वस्तींतून रात्रभर मौज–मजा करून कोणी तरी चाललें असेल. कदाचित्—

तोंच एका बंगल्याच्या गाडीखान्याच्या व्हरांड्याखालीं शेकोटी पेटलेली दिसली. वाटलें, रात्रीचें वक्ष भेदून ताजें लाल रक्तच जणूं बाहेर पडलें ! शेकोटीच्या त्या प्रकाशांत पांचसहा डोकीं दिसलीं. सारेच भिकारी दिसले. निदान हातपाय तरी शेकून घ्यावे म्हणून मी तिकडेच चाललों.

चांगलीच बैठक बसली होती त्यांची. त्या शेकोटीभोंवतीं सारे वर्तुळाकार बसले होते. फाटकीं कांबळीं आणि फाटके कपडे यांच्या बाहेर असलेलीं उघडीं शरीरें ते शेकीत बसले होते. मला पाहतांच त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला, " आ, जाओ ! भय्या ! बैठ जाओ ! तंबाखू पिओगे ? "

मी माझ्या मोडक्यातोडक्या हिंदींत उत्तर दिलें, " तामक तो नहीं पीता भईया ! जाडेके लिये थोडा आगकी जरूरत—"

सर्वांनीं माझ्याकडे नुसतें पाहिलें. मला प्रश्न वगैरे विचारले नाहींत ! विचारण्याजोगें कांहीं नव्हतेंच. रोज रात्रीं माझ्यासारखींच असंख्य माणसें त्यांनीं पाहिलेलीं होतीं. निशीथ-नगरीच्या रंगभूमीवर असंख्य खेळ त्यांनीं पाहिलेले होते. थंडीच्या रात्रीं पावसांत भिजत जे रस्तोरस्तीं भटकत असतात, ते कोणत्या कां थरांतले असेनात, ते निःसंशय आपल्याच जातींतले, असें या भिकाऱ्यांना वाटत असेल. दुःखाच्या आणि दारिद्र्याच्या पार्श्वभूमीवर सारीं माणसें एकाकार झालेलीं असतात. भिक्षुक व भटके, चोर आणि वेश्या, गुण्ड आणि घर सोडून बाहेर पडलेल्या साध्वी—सारीं एकाकारच !

त्यांनीं कुठून लांकडें, शेण्या, गोंवऱ्या, काटक्या जमविल्या होत्या कोण जाणें ! शेकोटी मात्र चांगलीच धगधगलेली होती यांत शंका नाहीं. मीं हातपाय शेकून घेतले. पांघरलेल्या चादरीवरलें पाणी बहुतेक शरीरानेंच शोषून घेतलें होतें; बाकी उरलेलें या आगीनें शोषून घेतलें. पौषांतल्या रात्रीं, गाडीखान्याच्या तळाखालचें हे भिकाऱ्यांचें अग्निकुण्ड—ग्रेट ईस्टर्न हॉटेलसारखेंच वाटलें !

शेकोटीच्या प्रकाशांत एकदां सर्वांच्या चेहऱ्यावर नजर फिरवून घेतली. किती अद्‌भुत चेहरे ! एका चेहऱ्याचें दुसऱ्या चेहऱ्याशीं किती साम्य ! त्यांचें वेगळेपण कोणतें तेंच कळेना ! जटा वाढलेल्या, दाढ्या वाढलेल्या, लठ्ठ लठ्ठ शरीरें, डोळे तारवटलेले धुंद ! वाटलें, ' युगायुगांतील अंतर तोडून गुहांत राहणारे आदिमानव या गंभीर रात्रीं कलकत्त्याच्या फूटपाथवर येऊन बसले आहेत ! त्या आदिमानवांसारखेच अग्निकुंड पेटवून हे बसले आहेत. समोर मारलेल्या शिकारीचें मांस भाजून-शिजून निघत आहे. सुधारणेचे सारे संस्कार नाकबूल करून, धिक्कारुन, श्रेणीरहित आदिमानवसमाज आपल्या अभिजात रानटीपणासह येथें अवतरला आहे ! '

दबलेल्या स्वरांत आपापसांत ते कसली तरी चर्चा करीत होते. थोडें लक्षपूर्वक कान देऊन ऐकूं लागलों. त्यांचें बोलणें ऐकूं येऊं लागलें. त्यांच्या म्हणण्याचा भाव असा होता:—

" मग कलकत्त्यावर बॉंब पडणारच तर !"

" पडणार नाहीं तर काय ? पडणार नसते तर चोहोंकडे हा अंधार कशाला ! हवाई जहाजें येतील, बॉंबचा पाऊस पाडतील आणि बड्या-बड्या इमारती बघतां बघतां जमीनदोस्त होतील ! "

" सगळ्या इमारती उडवून टाकतील ? मॉन्यूमेंट, चौरंगी सरकारी कचेऱ्या, लाटसाहेबांचा बंगला–तमाम सारीं जमीनदोस्त होतील ? "

" हो, तमाऽऽऽम !"

" किती भयंकर होईल ! "

" अलिपूरचा तुरुंगहि उडवून देतील काय ? आणि टांकसाळ ? आणि क्लाइव्ह स्ट्रीट ? या इमारतींत इतके इतके रुपये सांठले आहेत आणि जिवंत माणसं भुकेनं मरताहेत तडफडत–तळमळत ! "

मला हंसूं आलें ! किती खरें होतें त्यांचें म्हणणें ! एकीकडे संपत्तिच संपत्ति धूळ खात पडलेली आहे आणि दुसरीकडे भुकेनें व्याकुळलेलीं असंख्य माणसें पटापट पटापट मरत आहेत ! सुवर्णकुलीन सभ्यतेचें हेंच वास्तव स्वरूप ! जगांतील–सर्व देशांतील–सर्व बुभुक्षितांचा आर्त नाद या दोन वाक्यांत ध्वनित होत आहे. या गोष्टी कोणाला ऐकवाव्या लागत नाहींत ! समजावाव्या लागत नाहींत ! जनगणदेवतेची ही स्वयंस्फूर्त वाणी आहे !......

पण या ठिकाणीं अधिक वेळ बसतां नाहीं यायचें. पोलिस...पोलिसांना विसरून नाहीं चालायचें. ब्लॅक आउटच्या तमालकुंजांत ते राधिकेचा शोध करीत फिरताहेत. नजरेला नजर भिडली कीं... आटोपलाच कारभार ! मी भिकाऱ्यांच्या गोटांत दडून राहिलों तरी ......तरी त्यांच्या शोधक नजरेला गुंगारा देतां यायचा नाहीं....अन् माझ्याजवळचीं पत्रकें...माझ्याजवळचे कागदपत्र...एकदां का त्यांच्या हातीं लागले कीं संपलेंच !....ह्यावर काय काय होईल...नि काय काय नाहीं...! त्याबद्दल विचार न करणेंच बरें !

इतक्यांत शिटी ऐकूं आली. त्यानंतर लागलीच त्या वस्तींतून टालीगंज दणाणून सोडणाऱ्या दिग्विजयी पावलांचा आवाज ऐकूं आला.

मी तिथून लगबगीनें उठलों. आतां शरीर बरेंच ताजेंतवानें झालें होतें. थंड थंड गार झालेल्या शिरांतून आणि स्नायूंतून पुन: ऊष्ण रक्त वाहूं लागलें आहे असें वाटलें. पोटांत अति तीव्र भूक होती; पण तिची जाणीव आतां नव्हती. रात्रभर पशूसारखी तडफड तडफड करून ती भूक आतां थकून, शांत होऊन झोंपी गेली आहे असा भास झाला. दोन्ही पायांना आतां थोडा विसांवा मिळाला होता. वाटलें, चला, आतां थोडी पायपीट करायला हरकत नाहीं.

गुळगुळीत फूटपाथ किती अस्वाभाविक रीत्या गार गार वाटत होता ! जणूं बर्फानेंच तयार केलेला ! कोठें तरी गंगेचें पाणी उसळत उड्या घेत होतें, त्याचा झिरझिर कलकल निनाद ऐकूं येत होता. रात्र आतां फारशी उरली नसावी.

आकाशाचा काळा रंग अधिकच काळा झाला होता. रथतला घांटा-पलीकडून गंगेवरून येणाऱ्या झोंबऱ्या वाऱ्याचा स्पर्श अधिकच तीव्र वाटत होता. दुतर्फा असलेल्या मोठमोठ्या इमारतींवर दाट धुक्यांचे थरचे थर दिसत होते.

स्ट्रॅन्ड रोडसमोरून रेल्वेलाइन गेलेली... कांहीं अंतरावर दोन तीन मालगाड्या उभ्या होत्या. तागाच्या गुदामाशीं एकाकार होऊन. त्यापलीकडे चिरकाल कलकल निनाद करीत आलेली उदार गंगा अंधारांत स्वच्छंद वाहत चाललेली... स्वस्थला घाटावर पोर्ट कमिशनरचे कुली झोंपी गेलेले दिसत होते. त्यांतच रिक्षावाले होते, भटक्या लोकांच्या टोळ्या होत्या...जगन्नाथ घांटावर बोटींचे लाल निळे प्रकाश दिसत होते.

मी चपापलों. अंधारांत कोण कोणाला हटकीत आहे ? कदाचित् गुमटीचा गेटकीपर असेल,–कदाचित् माल–गुदामाचा पहारेकरीहि असेल...नि कदाचित् राजप्रहरीहि असेल !

मी झपाट्यानें पावलें टाकीत पुढें चाललों. रस्त्यांत सगळीकडे चिखल झालेला. बैलगाड्या नि लॉऱ्या त्या रस्त्यावरून गेल्यामुळें त्या चिखलांत भर पडली होती. लगबगीनें चालतां चालतां पायाच्याअंगठ्याला मध्येंच ठेंच लागली...कळवळल्यागत झालें...अंधेरी आली डोळ्यांपुढें.

...काशीमित्राचा घाट. चितांच्या लालपिवळ्या ज्वाळा भिंतीवरून दिसत होत्या. कोणाचा तरी नश्वर देह पंचमहाभूतांत विलीन होत होता. होवो बिचारा ! उरल्या रात्रीसाठीं एक चांगला आसरा तरी मिळाला...स्मशानाहून चांगली जागा कोणती मिळणार, असा विचार माझ्या मनांत आला.

कोणा तरी नातलगपातलग नसलेल्या माणसाचें प्रेत होतें तें ! स्मशानांत चिटपाखरूंदेखील नव्हतें. अंमळशानें एक डोंब आला. त्याचे डोळे झोंपेंतून उठल्यागत दिसत होते. त्यानें हातांत एक बांबू घेतला, चिता ठाकठीक केली, आणि नंतर तो चालता झाला. प्रेत जवळ जवळ पुरें जळून गेलें होतें. उजाडायला अजून तीन तास तरी असतील. त्या डोंबाला पहाटेपर्यंत ऊबदार कांबळ्यांत हे तीन तास निश्चितपणें घालवितां येतील !

चितेकडे पाहिलें. दोन हात, दोन पाय दिसत होते. किती विकृत ! प्रेत माणसाचेंच असावें असें वाटलेंदेखील नसतें कोणाला. जळत्या लाकडांच्या राशींत जळक्या डुकरासारखा दिसत होता तो माणूस !...लागलीच आठवण झाली...दक्षिण महासागरापलीकडील नरभक्षक, गोरा माणूस हातीं लागला कीं मोठें डुकर हातीं आलें असें समजून त्याला भाजून खात असतात !

निःस्तब्ध होऊन उभाच राहिलों. समोर दग्धप्राय मृतदेह, स्मशानांतली दुर्गंधी आणि गंगेचे केलोच्छ्वास !

तोंच चितेपाशीं एक रिकामी, दोऱ्यांची खाट दिसली. तें प्रेत याच खाटेवरून आणलें होतें यांत शंका नाहीं !

म्हटलें, ' जय भगवान ! ' इतके दिवस भगवानाचा, त्या शिष्ट सद्गृहस्थाचा विसर पडला होता, आणि आज त्याची अपार करुणा पाहून मनांत आस्तिक्यबुद्धि अवचित जागी झाली. इतक्या विलक्षण आगीपाशीं इतकी छान राजशय्या ! लाटसाहेबांच्या गादीलाही लाजविणारी ही शय्या ! या निर्जन स्मशानांत उभा असतांना माझ्या मनांत आलें, ' मीच सम्राट आलमगीर आहे...आणि आहे हा माझा मोतीमहाल ! स्वर्ग कुठं ? स्वर्ग कुठं ? पृथ्वीवर ! पृथ्वीवर ! '

हमेनस्त—हमेनस्त—यहाँ है हमेनस्त ! जिवंत माणसांच्या कलकत्त्याचें भय वाटतें; पण मृतांच्या कलकत्त्याचें असीम दाक्षिण्य कोण नाकबूल करील ?

अंगावरली चादर लपेटून घेऊन त्या खाटेवर अंग टाकून दिलें ! चितेची ऊब किती हेवा वाटण्याजोगी ! जळत्या प्रेताचा गंध क्लोरोफार्मचें काम करीत होता. अशा ठिकाणीं पोलिसांचे पायही सहसा पोंचायचे नाहींत अशी आशा वाटली. डोळे, डोकें जड झालीं होतीं. झोंप दगडासारखी भारी होऊन माझ्या देहावर, माझ्या जाणिवेवर पसरली.

" हरि बोलो...हरि बोलो..."

" राम बोलो...भाई राम..." या गर्जनेनें मी धडपडत उठलों !

असंख्य लोक आणि दोन नवीं मढीं या स्मशानांत येऊन पोहोंचलीं होतीं. कडकडीत उन्हानें कलकत्ता जीवंत, जागृत झालें होतें. काशीमित्र घाटावर स्नानार्थिनींची दाटी झाली होती.

मनांत आलें, ' आतां साडेआठ तरी वाजले असतीलच. आतां या महानगरींतील रस्त्यावरून बिनधोक आसऱ्याचा शोध करीत हिंडायला कांहीं हरकत नाहीं ! '

एक हजार एकर प्लँटेशन. हा चहाचा मळा कांहीं अगदींच लहान नव्हता. इतस्ततः पसरलेल्या शिरीषाच्या छायेंत सारखीं छाटलेलीं चहाचीं झाडें–हिरवागार समुद्रच पसरल्यासारखा भास होई!

सुपरवायझर मधुबाबूंनीं हॅट डोक्यावर चढविली. सहा फूट उंचीचा, पसरट चेहऱ्याचा हा माणूस! रंग काळा. उन्हानें कोळपलेल्या पत्थरासारखें कठीण शरीर. धड आणि गळा यांच्या दरम्यान तीन समांतर पांढऱ्या खुणा. रामसई जंगलांत वाघानें या स्वारीवर झडप घातली होती, त्याच्या या खुणा. डाव्या हाताच्या रुंदट मनगटावर एक मोठेंसें रिस्टवॉच.

मधुबाबूंनीं आपल्या कुटिल आणि तीक्ष्ण नजरेनें एकवार चोहोंकडे पाहून घेतलें. सतरा नंबरच्या प्लॉटमध्यें 'प्लकिंग' चालू होतें. ओरांव व संताळ मजुरणींचे हात जणूं चहाच्या झुडुपांच्या माथ्याशीं खेळ खेळत होते. त्यांच्या पाठीवरल्या झोळ्यांत सरस चहाच्या पानांचे ढीगच्या ढीग जमत होते.

आकाशांतून तीक्ष्ण उन्ह ओसंडत होतें. सूर्य जणूं अग्निवर्षाव करीत होता. कांहीं कांहीं मजुरणींनीं आपल्या पाठीला छत्री बांधून घेतली होती. स्वतःसाठीं नव्हे; चहाच्या झोळीजवळ, कापडाच्या मोटलींत, त्यांचे पोटचे गोळे होते. तान्हीं दूधपितीं मुलें–त्यांच्यासाठींच ही व्यवस्था!

डावीकडल्या रांगेंत एक मजुरीण बरीच पुढें चालली होती काम झपाझप झपाझप उरकीत. आतां ती एका शिरीष वृक्षाच्या आड आली होती. त्यामुळें ती नीट दिसत नव्हती. चहाच्या झुडुपांवर दिसत होते तिचे बाहू, तिचीं बोटें. अंमळ इकडे तिकडे करून मधुबाबूंनीं तिच्याकडेच आपला मोर्चा वळविला.

मजूरस्त्रियांच्या डोळ्यांत अग्निशिखा चमकून गेल्या. दोन चार स्त्रियांच्या तोंडून जलतरंगासारखे गोड हंसें बाहेर पडलें आणि दशदिशांत मिसळून गेलें.

त्यांना कळून चुकलें होतें हें. किती तरी दिवसांपूर्वीच त्यांनीं ताडलें होतें हें. त्यांचें हें हंसणें मधूबाबूंच्याहि अंगवळणीं पडलें होतें. आणि मजूरणीशीं लाडलगट करणेंहि त्यांच्या अंगावळणीं पडून गेलें होतें. कारण बंगाल–आसामच्या चहाच्या मळयांत ते कांहीं नव्यानें आलेले नव्हते. चागलीं पंचवीस वर्षें काम करीत आले होते ते !

हातांतील लाठी टुकठुक करीत मधुबाबू त्या तरुणीकडे निघाले. ती ज्या झुडुपावरून पानें खुडीत होती, नेमक्या त्या झुडुपासमोर ते येऊन उभे राहिले. दुसरी एखादी असती तर ती थक्क होऊन गेली असती, संत्रस्त झाली असती. कामांत तिच्याकडून चूक झाली असती. खुडणींची पातळी इंचभर कमी झाली असती कदाचित्. आणि तसें झालें असतें म्हणजे–मग कांहीं धडगत नव्हती ! समोर पुरुष आहे कीं स्त्री आहे याचा बिलकुल विचार न करतां मधुबाबूंची लाठी पाठीवर पडली असती !...पण ही मजुरीण मोठी वस्ताद. तिनें मधुबाबूंकडे पाहिलें देखील नाहीं. निर्विकार चेहऱ्यानें तिनें आपलें काम चालूच ठेवलें.

ऊन आतां माथ्यावर आलें होतें. बारा वाजायची वेळ झाली होती. काम बंद व्हायचा भोंगा वाजायला आतां जास्त वेळ उरलेला नव्हता. दिवसाची मजुरी या उरल्या वेळांतच शक्य तों अधिक पदरांत पाडून घेणें भाग होतें.

शिरीष वृक्षाच्या आडून इतर मजूरणींना दिसण्याजोगें नव्हतें. आसपास दुसरी काम करणारी कोणी नव्हती. मधुबाबू खांकरले व म्हणाले, " टूनी–टूनी––"

टूनी जळफळून म्हणाली, " हा काय तुमचा लघळपणा ! माझी कामाची वेळ आहे ही ! या वेळीं नको तुमचा त्रास."

" अरे वा ! अरे वा ! तुझं कामदिखील पाहूं नये वाटतं ?"

" कामच पाहायचं आहे ना ? मग चुपचाप उभे राहून बघा ना ! हा ओरडा कां उगाच ?"

" हात्तिच्या ! " मधुबाबूंनीं चटकन् टूनीचा एक हात धरला, आणि तो आपल्याकडे ओढला. " म्हणे, काम करतें आहें ! ठेवून टाक तुझं तें काम ! येऊन जाऊन मिळवणार काय ? चार आणे, नाहीं तर सहा आणे ! मी करीन तुझ्या मजुरीची भरपाई ! "

टूनीनें विद्युत्वेगानें आपला हात सोडवून घेतला नि ती बाजूस दूर जाऊन उभी राहिली! फणफणत म्हणाली, "बाबू, तुम्हाला कांहीं लाज, डर नाहीं का? या दिवसाच्या वेळीं तुमचं हें असलं वागणं--"

मधुबाबू हंसले! सहा फूट उंचीच्या, घडधाकट शरीराच्या, काळ्या तोंडाच्या या माणसाच्या चेहऱ्यावर मूर्तिमंत लोलुपता दिसूं लागली. तो लोलुपतेनें म्हणाला, "टूनी, मी तरी काय करूं ग? मला पाहिलंस कीं तूं नेहमीं दूर दूर जातेस–! पळत असतेस जणूं माझ्यापासून. त्यामुळं मला काळ–वेळाचं, दिवसरात्रीचं भानच नाहीं उरत! तूं अशी...माझा काय बरं दोष?"

"इश्श्य–इश्श्य! अगदींच काय असं?"

एका तीक्ष्ण कटाक्षानें मधुबाबूंना घायाळ करून टूनी आणखी कांहीं पावलें मागें सरकून उभी राहिली. नाजुक अंगुलींच्या स्पर्शानें चहाचीं पानें दक्षिणेकडील वाऱ्यानें झरून पडणाऱ्या फुलाच्या पाकळ्यांसारखीं हातांत येऊन पडूं लागलीं!

भर दुपारच्या प्रखर उन्हाचा प्रभाव मधुबाबूंवरही होऊं लागला. घामाच्या धारा निथळूं लागल्या.

हजार एकर बागेच्या श्यामल समुद्रांत फॅक्टरीची काळीकुट्ट चिमणी धुराचे सुस्कारे सोडीत उभी होती. जणूं एक भलें मोठें जहाजच या समुद्रांत स्तब्ध उभें होतें! शिरीषाच्या पानोपानीं वारा खेळत होता. चहाच्या या मळ्यापलीकडे दुर्गम व अनंत शालवन ताठ मानेनें उभे होते. त्या वनांतून मोरांचा केकारव ऐकूं येत होता. आणि इकडून फॅक्टरींतून यंत्रांचा तोच तो आवाज एकसारखा साद घालीत होता. युद्धाच्या मागणीमुळें यंत्रांना विसावा मुळींच नव्हता. प्लायवुडच्या पेट्यांत बंदी होऊन हजार हजार पौंड ग्रीन टी, ब्लॅक टी आघाडीवर रवाना होत होता. रणक्लान्त सैनिकांना ताजेतवाने करण्यासाठीं. शत्रूंचा निःपात करण्याची प्रेरणा देण्यासाठीं!

मधुबाबूंच्या शरीरांतील रक्त तापलें, खवळून उठलें. त्यांच्या लहान लहान दोन डोळ्यांतून जणूं ठिणग्या पडूं लागल्या. शिरीषाच्या झाडानें आडोसा किती चांगला दिला होता! पण त्याचा फायदा घेऊन कांहीं मनाजोगतें उरकण्याआधींच कशाचा तरी प्रचंड आघात लागून त्यांची दबलेली कामना सजीव होऊन उठली!

मधुबाबूंच्या डोळयांत आग किती धगधगली होती ! पण त्या आगी-हून हजारपट आग आणखी दोन डोळ्यांतून बाहेर पडत होती ! हें कलियुग आहे म्हणून मधुबाबू वांचले ! सत्ययुग असतें तर त्या डोळ्यांतील अग्नि-तापानें एव्हांना मधुबाबूंच्या शरीराची राखरांगोळी होऊन त्यांच्याऐवजीं राखेचा ढीग तेथें उभा राहिला असता ! बिंबग्राही कांचेप्रमाणें आकाशां-तील सूर्याचीं प्रखर किरणें आपल्यांत सामावून घेऊन नंतर तीं मधुबाबूंवर परावर्तित करण्याचा प्रयत्नच जणूं त्या दोन डोळ्यांनीं चालविलेला होता !

मधुबाबू दचकून थबकून जागच्या जागींच उभे राहिले. त्यांच्या मनांत आलें, " हा लेकाचा किती तरी मागें होता. अन् बघतां बघतां इथें कसा येऊन पोंचला हा ? माझ्यावर पाळत ठेवण्यावांचून इथं येण्याचा त्याचा दुसरा हेतुच नसेल ! "

त्यांच्या दणकट मनगटानजीकची दणकट मूठ लाटीवर आवळली गेली. वाघानें झडप घातल्याची खूण म्हणून राहिलेले डाग जळजळूं लागले. त्यांच्या मनांत आलें, " हा राजूग्रा-लेकाचा आहे किती दुबळा ! अंगांत शक्ति नाहीं, अवजड काम करवत नाहीं, म्हणून कामकरी बायकांत मिसळून चहाचीं पानं वेंचण्यासाठीं येत असतो ! पण...पण... त्याच्याच डोळ्यांत आव्हान दिसत आहे आज-आव्हान-मला आव्हान ! "

मधुबाबूंचे दांत कडकडूं लागले. राजूयाला चावून गिळून टाकावें असें त्यांना वाटलें. पायांतील अवजड बूट करकरवीत ते पुढें सरकले. राजूयाची नजर आतां जमिनीकडे लागून राहिलेली त्यांना दिसली. पण मनांतल्या क्षोभानें त्याचे दोन्ही हात थरथर कांपत आहेत हें त्यांच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

अग्निगर्भ डोळे रोखून मधुबाबू राजूयाच्या कामाची पाहणी करूं लागले. कांहीं क्षण या पाहणींतच गेले. आणि नंतर—त्यांनीं आपल्या बलिष्ठ हातांनीं असलें नसलेलें बळ एकवटून जोरानें राजूयाच्या कानफटांत भडकाविली ! ही थप्पड इतक्या जोराची होती कीं तिच्या आवाजाचे प्रतिध्वनि साऱ्या चहाच्या मळ्यांत दुमदुमले !

" पाजी, हरामखोर-रास्कल ! काय चालवलंयूस हें तूं ? "

जोराच्या थप्पडीमुळें तिरीमिरी येऊन राजूया एका झाडावर पडला होता. तो कसाबसा उभा राहिला व गाल चोळीत चोळीत म्हणाला, " बाबू–तुम्ही कां मारलंत मला ? "

" मारूं नको तर काय करूं ? पाजी, सुवर कुठला ! कैंची किती खालून चालवतोयस् याची शुद्ध आहे का ? बघ–बघ जरा डोळे उघडून ! "

खरंच ! त्याच्या हातून अपराध घडला होता हें कांहीं खोटें नव्हे. मनांतल्या खळबळाटामुळें केव्हां आपण प्लकिंग खालीं नेलें याचें भानच राजूयाला उरलें नाहीं ! पण आतां त्याला वाटलें " हें काय–असं नेहमींच होत असतं ! माणूस हा बोलून चालून माणूसच. माणूस म्हणजे कांहीं यंत्र नव्हे कीं एकदां कळ फिरविली कीं एकसारखं काम करीत राहील ! हात जसाच्या तसाच नेहमींच कसा काम करीत राहील ?...अन् म्हणूनच हा अपराध कांहीं मोठा नव्हे ! इतका मोठा तर नव्हेच नव्हे कीं ज्याच्यासाठीं सुपरव्हायजरसाहेबांनीं मला अशी झणझणीत थप्पड मारावी ! पण कांहीं ना कांहीं निमित्त करून मला मारायचंच होतंसं दिसतंय् !"

तरी पण तो म्हणाला, "चूक झाली साहेब माझ्या हातनं !"

दांत ओंठ आंवळीत, त्याला वेडावीत मधुबाबू म्हणाले, " च्यूक झाली साहेब ! चूक झाली ? लाज नाहीं वाटत सागायला ? पुरुषासारखा पुरुष तूं ! पण बायकांबरोबर येतोस काम करायला ! तरी दिखील बायकांसारखंसुद्धां काम नाहीं करतां येत ? अगदींच कुचकामी–पशु आहेस पशू !"

चहाच्या मळ्यांत बायकांत हंशा पिकला ! त्यांचें हंसणें जलतरंगासारखें मंजुळ नव्हतें ! दुपारच्या जाळत्या भाजत्या उन्हांत विष माखलेल्या तीरासारखें तें हंसणें आपल्या शरीराला विंधून टाकीत आहे असा भास झाला राजूयाला. विंचू डसल्यानंतर वेदना होतात तशा वेदना त्या थप्पडी-मुळें त्याला होत होत्या. त्याच्या डोळ्यांच्या कडा आसवांनीं ओल्या होऊं पाहत होत्या; पण मनांतल्या उत्तापानें त्याचीं आंसवें सुकलीं, त्यांचें बाष्प झालें आणि हवेंत विरून गेलें.

कामकरी बायांचें हंसणें त्याला दिसत होतें–ऐकूं येत होतें. त्या हंसण्याच्या आवेगानें त्या बायांच्या काळ्या काळ्या डौलदार शरीरावर सौंदर्यलहरी

उमटत आहेत हेंहि त्याला दिसत होतें. आपल्या पायाखालची जमीन थरथर कांपत आहे असा भास त्याला झाला. त्यानें मनांतल्या मनांत निश्चय केला–" बस्स ! खून करायचा या मधुबाबूचा ! एकाद दिवशीं मजूरवस्तींत येऊं दे संध्याकाळच्या वेळीं–त्याचं मुंडकंच वेगळं करून टाकतों धडापासनं ! "

तोंच भोंऽऽऽऽ असा भोंग्याचा आवाज सुरू झाला.

फॅक्टरीचा भोंगा–बाराचा भोंगा. हां हां म्हणतां क्षणभरांत पानें खुडण्याचें काम बंद झालें. सकाळचें काम इथेंच संपलें. आतां फॅक्टरींत जायचें, पडलेलीं पानें जमा करायचीं, जेवढें काम झालें असेल त्या मानानें दाम पदरीं पडायचे !

भोंऽऽऽभोंऽऽऽभोंऽऽऽऽऽ

भोंगा अधीरपणानें हांकारीत होता. रांग मोडून मजूर स्त्रीपुरुष धांपा टाकीत फॅक्टरीकडे निघाले. मधुबाबू या गर्दीत दिसेनासे झाले. टूनि दिसेनाशी झाली, राजूया दिसेनासा झाला.

× × × ×

फॅक्टरीला विसांवा कसा तो नाहींच !

सकाळीं आठ वाजल्यापासून रात्रीं साडेनऊपर्यंत यंत्रें अव्याहतपणें घरघर करीत चहाच्या पानांवर सर्व तऱ्हेच्या प्रक्रिया होत. जाळ्यावर पानें पसरून आधीं " विदरिंग, " नंतर यंत्रांच्या निष्ठुर पिष्टणानें हिरवा रस गाळून घेऊन ड्राइंग मशिनमध्यें तीं पानें टाकलीं जात. त्यानंतर चाळणींतून जात आणि तळाशीं ' चहा ' जमा होई. त्यानंतर सॉर्टिंग-ब्लेंडिंग. ऑरेंज पिको, पिको फॅनिंग्स–किती विचित्र नांवें मिळत त्या चहाला !

तिकडे पलीकडे पत्र्यांच्या घरांवर मजूर वस्तींवर विषण्ण अंधार दाटून येई. दिवसभर नायट्रोजन आंत ओढून घेऊन रात्रींच्या वेळीं चहाचीं लाखों झाडें कार्बनच्या विषाचे सुस्कारे सोडीत. मलेरिया–काळा ज्वर–अनारोग्य ! यंत्राच्या तापांत, लोखंडाच्या कोलाहलांत, रोस्टिंगच्या कडू बाष्पांत आणि क्रूड ऑइलच्या दुर्गंधांत कूली काम करीत आणि नेमकें त्याच सुमारास दूरदूरच्या शहरांत चहापात्रें समोर सजवून घेऊन संध्याकाळचे गप्पांचे अड्डे बसत; रेडिओ-

मध्यें उदास करून सोडणारें क्लॅरोनेट वाजे; चहाच्या टेबलावर स्वप्नसृष्टि उतरे; चहा पितां पितां त्या मंडळींना कोठल्या तरी नदीकांठच्या तमाल-कुंजाची, तिथें संताळ पुरुषांनीं वाजविलेल्या ढोलक्याची, त्याच्या तालावर नाचणाऱ्या संताळ बायकांची आठवण होई! मग त्यांच्यापैकीं कांहीं जण लांबच लांब सुस्कारे सोडीत आणि स्वतःशींच म्हणत, "असं इथं बसण्यापेक्षां संताळ झालों असतों तर किती चांगलं झालं असतं!"

पण चहाच्या मळ्यांतील संताळांना असें वाटत नसे. पियाली नदीच्या कांठीं पोटाची खळगी भरण्यासाठीं भाताची तरतूद नव्हती म्हणून बिचारे चहाच्या मळ्यांत खपण्यास येत. त्यांचे आवडते ढोल कुठें गेले? फॅक्टरीच्या धुळींत भंगून, फाटून निश्चिन्ह झाले! मोहाच्या झाडापासून काढलेली दारू कोठून मिळायला? देशी दारूची किंमत पांचपट वाढलेली! मनमुराद नाचण्याइतकें त्राण कोणाच्या पायांत नाहीं; ॲनोफिलिसनें पायांतली सारी शक्ति कधींच शोषून टाकली आहे!

फॅक्टरीमागल्या लांकडी जिन्यावर अंधार दाटून आला होता. राजूया निमूटपणें तिथें येऊन बसला. डाव्या बाजूस बाबू लोकांच्या क्वार्टर्स! विजेच्या प्रकाशांत त्या झगमगत होत्या. पलीकडे जिथवर नजर पोंहोंचे, तिथवर हजार एकर चहाचा विस्तीर्ण मळा! त्या मळ्यावर आतां अंधार दाटून आलेला. त्या विस्तीर्ण मळ्याच्या पलीकडे गगनचुंबी शालवन पहाडासारखें उभें!

"कोन बैठा है यहाँपर?"

मजुरांच्या पंजाबी सरदाराचा आवाज ऐकूं आला. आवाज गंभीर, करडा; त्या दाटलेल्या अंधारांतहि सरदारजींच्या चेहऱ्यावरील दाढीमिशा जणूं स्पष्ट स्पष्ट दिसत होत्या.

सरदारजींच्या सवालाला राजूयानें उत्तर दिलें,—

"राजूया."

"राजूया? हाः हाः हाः!" ऑइल इंजिनसारखें गंभीर कर्कश हंसत पंजाबी सरदार म्हणाला, "बहोत अच्छा, बहोत अच्छा,! हवा खाओ! हवा खाओ! पत्ती तोडनेंमें बहुत मेहनत—आँ—हैं न?"

करकर वाजणारे बूट कुरकूर करीत फॅक्टरीकडे वळले.

काळया अंधारांत आपलें काळें शरीर मिसळून राजूया तेथेंच बसून राहिला. सारे त्याला हिडीस फिडीस करीत, त्याची उपेक्षा करीत, त्याचा अपमान करीत. दुबळें शरीर, खंगलेलें आरोग्य, जो तो त्याची थट्टा करी. सारे त्याच्याकडे दयेच्या नजरेनें बघत. बायकांपेक्षांही दुबळा आहे हा असें मानीत.

राजूयाच्या मनांत आलें–" असें कां ? कोणी केली अशी माझी दशा ? दुमका माझं गांव. तिथून इथं आलों तेव्हां माझी तब्येत किती छान होती. दगडासारखी घट्टमुट्ट होती. शरीर पाहून पुरुष मंडळींना हेवा वाटे. बायका प्रसन्न नजरेनें बघत राहत. माझ्या हाताचा स्पर्श झाला कीं यौवनाच्या आनंदानं ढोल कसा बोलूं लागे. जणूं मनांतलीं गुपितं उघड करी ! काम तरी किती केलं ! सेस्टिंग मशिनवर काम केलं, ड्राइंग खात्यांत काम केलं, डायनामोवर पट्टा चढवण्याचं काम केलं, किती तरी दिवस दुपारच्या वेळीं शूइंग केलं ! ते दिवस–कुठं गेले ते सारे दिवस ?

या चहाच्या मळयानंच माझं सारं रक्त शोषून घेतलं. इथल्या वाऱ्यानं जणूं एका घोटासरशीं माझ्या शरीरांतलं सारं रक्त ओढून घेतलं. संताळ परगण्यांतले पंचाक्षरी भुतं सोडून हालत्याचालत्या माणसाचं हृदय खाऊन टाकायला लावतात ! माझ्या बाबतींतहि असंच झालंय्. हा चहाचा मळा. हजार ब्रिध्यांचा हा मळाही भुतानंच पछाडलेला आहे. या भुताच्या ताव-डींतून कुण्णी कुण्णी सुटायचं नाहीं–कुणाचंहि रक्षण नाहीं व्हायचं या भुतापासून !

तब्बल दोन वर्षं काळाज्वरानं पछाडलं. त्यानंतर शरीरांत नुसतीं हाडं उरलीं. तीं हाडं झांकण्यासाठीं नुसती कातडी राहिली. सारं जीवनच जणूं माझ्यापासून दूर दूर राहूं लागलं. आतां नुसतं जगायचं–मरण येत नाहीं म्हणून ! आज मधुबाबूंनीं मारलं. पूर्वीचा तो जोर-जोम अंगीं असता, तर ह्या अपमानाच्या ज्वाला अशा निमूटपणानं सहन केल्या असत्या का ? शक्यच नाहीं ! एका ठोशानं मधुबाबूंचे ते पुढं आलेले सारे दांत पाडून टाकले असते आणि गेलों असतों पळून–शिरलों असतों आसाममध्यें–मिलिटरींत काम करायला !

पण करणार काय ? हें शरीर–दुबळं शरीर ! त्यानं मला पंगु बनवलंय्–असाहाय्य करून ठेवलंय्–मृत्यूच्या शृंखलांत जखडून टाकलंय् ! इथून हाला-

यची मुळीं सोयच उरलेली नाहीं. आणि टूनि ! दोन वर्षांपूर्वी तिचं-माझं लग्न व्हायचं जवळ जवळ ठरल्यासारखंच होतं. पण नंतर माझं हें शरीर खंगायला लागलं नि टूनीच्या बापानं अखेर लग्नांत मोडता घातला–बेत फिरवला!... आणि आज मधुबाबू–टूनीशीं...

मधुबाबूंची आठवण होतांच राजूयाचं रक्त खवळलं......"मधुबाबू ! या मधुबाबूला जिवानिशीं ठार करून टाकलं पाहिजे ! केव्हां तरी, कसा तरी त्याचा खून केला पाहिजे–केलाच पाहिजे !"

जिन्यावर कोणाच्या तरी पावलांची चाहूल ऐकूं आली.

राजूयानें विचारलें, " कोण आहे ? " " टूनि ! "

हलक्या पावलांनीं टूनि वर आली.

" राजू, इथंच बसून आहेस का तूं ? "

" हो, हो, इथंच बसणार मी ! तुझं काय जातं त्यांत ? "

" असं रागावतोस कां रे ? " अंधारांत टूनीचें गोड हंसणें त्याला ऐकूं आलें.

" माझ्यावर रागावलास का ? कां ? मी कांहीं मारलेलं नाहीं तुला ! "

" टूनीनं मारलं नाहीं ! मारलं असतं तरी मला काय करतां आलं असतं ? " राजूयाचें रक्त गरम होऊं लागलें. तरी तो चूपच राहिला. सभोंवतीं अंधार दाटलेला, आसपास दुसरें कोणी नाहीं. नुसतें वाटायचाच अवकाश कीं टूनीला छातीशीं कवटाळतां येईल, घट्ट घट्ट मिठी मारतां येईल. पण देहांत शक्ति नाहीं, मनांत शक्ति नाहीं. अन् डोळ्यांसमोर मधुबाबूंची अशरीरि मूर्ति–जणूं एकाद्या निष्ठुर दुःस्वप्नासारखी उभी असलेली ! उन्हानें काळवंडून गेलेली सहा फुटांची ती मूर्ति–तिच्या तोंडावरलें तें लोलुप निष्ठुर हंसणें ! मधुबाबूंच्या अंगावरल्या वाघाच्या पंजाच्या त्या खुणा ! पावलोपावलीं होणारे त्यांचे ते हातवारे, त्यांच्या लाठीची ती हालचाल ! मधुबाबू मॅनेजरसाहेबांचे लाडके–चहाच्या मळ्यांत त्यांचा केवढा दरारा.

" राजू, मधुबाबूंनीं तुला मारलं, किती वाईट वाटलं मला ! तूं जरा सावधपणानं काम करीत राहिला असतास तर—!"

राजूया कांहींच बोलला नाहीं.

टूनी स्नेहभरानें म्हणाली, " राजू, असा कसा रे अगदींच हा तूं ? कां सहन करतोस तूं हें सारं ? पुरुषासारखा पुरुष तूं—कां नाहीं पुरुषासारखं वागत ! निमूटपणानं पडल्या पडल्या असा मार कां खात असतोस ? "

राजू कठोर स्वरानें ओरडला, " टूनी, चालती हो बघूं इथून ! "

टूनी मिस्किलपणानें हंसली. तिचें हंसणें राजूयाला कठोर वाटलें. तिच्या स्वरांतला क्षणभरापूर्वीचा स्नेह, त्यांतली सहानुभूति क्षणार्धांत कोठच्या कोठें नाहींशी झाली !

" मी चालती होऊं इथून ? अन् कां म्हणून ? तूंच चालता हो वाटल्यास. खरंच, राजू, असा उघड्यावर नको बसून राहूं ! तुझं शरीर हें असं दुबळं—थंडी लागेल—आणि आजारी मात्र पडशील बघ ! "

" माझी नको तुला काळजी ! "

" मी रे कशाला करूं तुझी काळजी ? मधुबाबू करीतच असतील तुझी काळजी ! " टूनी निष्ठुरपणानें हंसूं लागली. म्हणाली, " मधुबाबू यायचेच आहेत आत्तां इथं—नाहीं उठलास इथून तर चांगला सांपडशील त्यांच्या तावडींत ! "

राजूया विद्युत्वेगानें उठला. त्याच्या मनांत आलें, " ही कारटी हंसते आहे, निष्ठुरपणानं हंसते आहे ! या अंधारांत सारी शक्ति एकवटून हिचा गळा दाबला तर, तर—कितीसा वेळ हंसत राहील ही अशी ?... "

पण हें नुसतें त्याच्या मनांत ! त्यानें तसें केलें मात्र कांहींच नाहीं. तो निमूटपणें उठला नि पायऱ्या उतरूं लागला !

वर टूनी हंसतच होती, काळ्या काळ्या मिट्ट अंधारांत तिचें तें हंसणें जणूं आपला पाठलाग करीत आहे असा भास राजूयाला झाला.

× × ×

त्यानंतर दोन दिवस राजूया पानें वेंचायला आला नाहीं. पण दोन हजार मजूर. राजूया आला कीं नाहीं याची दखल घ्यायला फुरसत कोणाला ? कारखान्यांतील यंत्रांचीं कामें यथापूर्व चालूच होतीं. हजार हजार पौंड चहा—ब्लॅक टी, ग्रीन टी—तयार होत होता. युद्धाच्या ऑर्डरी ! सभ्य जगांतील सुधारलेल्या लोकांच्या ऑर्डरी ! शहरांतील ड्राइंग रूममध्यें सोनेरी

चहाचीं पात्रें समोर ठेवून शहरी लोक आपल्या मनांत रोज रोज सोनेरी स्वप्नें पाहतच होते !

आपणच घेतलेल्या सुटीच्या त्या दोन दिवसांत राजूयानें बसल्या बसल्या आपला तिरकमठा तयार केला. संताळी तीरांचीं पातीं तळपूं लागलीं. एखाद्या विषारी सापाचें विष मिळालें असतें, तर-तर त्यानें तें त्या तीरांना माखलें असतें नि मग अचूक शिकार साधली असती. एकदां का तीर अंगांत घुसला, विष रक्तांत भिनलें कीं आटोपला सारा जीवनाचा कारभार !

त्या दिवशीं पहांटेसच मजूर वस्तींत ढोल वाजूं लागले. राजूयाला नवल वाटलें. दूर कारखान्यांत पहिल्या भोंग्याचा आवाज ऐकूं आला. पण या ढोलांच्या आवाजापुढें त्या भोंग्याच्या आवाजाची काय कथा ! तो आवाज कोणासच ऐकूं येईनासा झाला. ढोलांचा आवाज मात्र वातावरणांत दुमदुमूं लागला. मलेरिया-मंथर रक्ताच्या लक्ष लक्ष कणांत भरतीची हांक ऐकूं येऊं लागली !

हें ढोल पिटणें कशासाठीं ? वसंतऋतूंत रात्रीच्या वेळीं मोहाच्या दारूच्या निशेनें विव्हल होऊन जें ढोल वाजवणें होतें, तें हें नव्हे ! हें ढोल वाजणें ऐकून राजूयाला आपल्या गांवची आठवण झाली. विसर पडलेल्या मस्त जीवनाची आठवण झाली. अमर्याद शक्तिमान जीवनाची याद आली ! पहाडावर काळ्या ढगांची दाटी होई. आधीं झिम् झिम् झिम् झिम् नंतर धो धो धो धो मुसळधार पाऊस पडूं लागे. काळ्या काळ्या फत्तरावरून पाण्याचे ओघळच्या ओघळ वाहूं लागत. नदी तुडुंब भरून जाई. पावसाच्या झडीसरशीं शालवृक्षाचीं फुलें गळून पडत, पानें वाऱ्यासंगें उडून जात ! वाघ-कोल्हे, या पावसाळी वातावरणांत दिङ्मूढ होऊन जात. तीरकमठ्याचा नेम धरून त्यांची शिकार साधण्यास ही सोनेरी संधि असे !

राजूला या साऱ्या प्रसंगांची आठवण झाली आणि तो बाहेर आला. ढोल, सनई वाजतच होत्या. मजूर वस्तींतले सारे जवान बाहेर येऊन ओळीनें उभे राहिले होते. त्यांच्या पाठीवर धनुष्य, हातांत बल्लम ! जणूं लढाईवरच निघालेले सारे !

“ काय रे, कुठं चाललां सारे ?”

" आज विशूया !"

विशूया ! खरेंच कीं ! वैशाखाचा पहिला दिवस आज ! या दिवशींच आदिभूमींतील धरतीचीं लेकरें शिकारीसाठीं बाहेर पडत. आज त्यांचा शिकारीचा सण ! त्यांच्या हिंस्र रानटी जीवनाचा, नववर्षाचा आनंद व्यक्त करण्याचा आजचा हा दिवस! आज फॅक्टरींतील सर्व जवानांना सुटी—राजाच्या जंगलांत आज शिकारीसाठीं सर्वांना मोकळीक. कोणालाच बंदी नाहीं ! चहाच्या मळ्याचे मालक कांहीं नेहमींच अविवेकी नसतात !

" मी यणार विशुया खेळायला ! "

" तूं ! "

ढोलांचा आवाज बुडवून टाकून सर्व मजुरांचें हंसणें वातावरणांत घुमूं लागलें. त्यांचें तें तीव्र हंसणें ! मोठ्या तारेच्या झंकारापेक्षां बारीक तारेचा झंकारच कानांवर तीव्र आघात करतो ! टूनीचें—पलीकडे उभ्या असलेल्या टूनीचें–हंसणें हें असलें हंसणें होतें. तें त्याच्या कानांत घुसलें–मनांत घुसलें. पण एरवीं त्याला जसा संकोच वाटे, त्याची मान जशी खालीं जाई, तसा संकोच राजूयाला आज वाटला नाहीं–त्याची मान खालीं गेली नाहीं ! त्यांच्या डोळ्यांत सूर्यकिरण चमकले. मधुत्राबूंची पाळी नंतर. त्यांच्या आधींच—

" मी चाललों जंगलांत ! "

राजूया तीरासारखा घरांत गेला; तीरकमठा घेऊन बाहेर आला.

सारे मजूर जवान खो खो खो खो हंसूं लागले. टूनीची तर हंसतां हंसतां मुरकुंडी वळूं लागली.

पण राजूया तेथें जरा वेळ देखील उभा राहिला नाहीं. आपण एकट्यानेंच शिकारीस जायचें, एकाचीच शिकार मारयची अशा निश्चयानें नक्षत्रांच्या वेगानें राजूया अरण्याकडे निघाला.

चहाचा मळा ओलांडतांच शालवन लागलें. हें जंगल सोळा सतरा मैल विस्ताराचें. तिस्ता नदीच्या कांठाकांठानें तेराईपर्यंत पसरलेलें. एका हातांत तीरकमठा घेऊन राजूया जंगलांत शिरला.

शालवनांत लतागुल्मांची दाटी झालेली. माथ्यावर आकाश दिसत नव्हतें. पायतळीं शालवृक्षांचीं सुकलीं–पिकलीं पानें कुरकुर करीत होतीं. कांहीं दिवसां-

पूर्वीच या अरण्यांत दावानलानें पेट घेतला होता. त्या आगींत जळून गेलेलीं निष्पर्ण झाडें असाहाय्यपणें उभीं होतीं. जंगलांतील पशुपक्षांचे आवाज ऐकूं येत होते. समोरून रानकोंबडे धांवत होते. राजूया पुढें पुढेंच चालला होता. राहून राहून कांटेरी लतांचे चाबूक सपकन् तोंडावर, शरीरावर आघात करीत होते.

" अरे, त्या बाजूनं कोण पळालं ? " राजूयाच्या मनांत विचार आला " कोणी तरी पळालं खरं ! कोण ? बहुधा सांबरच ! त्याच्यावर नेम धरून त्याला खालीं बसविलं कीं झाली फत्ते ! इकडून तिकडून रानकोंबड्या धांपा टाकीत धांवत होत्या. एक रानकोंबडा, एक रान-कोंबडी, दोन तीन पिल्लें, आख्खें कुटुंबच्या कुटुंब धांवत होतें. राजूयानें मनांत आणलें असतें, तर त्यांची शिकार करतां आली असती. पण छोट्या शिकारींवर त्याचें लक्षच नव्हतें; आज मोठी शिकार मारायची, वाघ, अस्वल, सांबर, नीलगाय–हाताशीं येईल ती मोठी शिकार साधायची असा त्याचा बेत.

समोरच आठदहा हातांवर झऱ्याची क्षीण धारा वाहत होती. झाडांच्या सुकल्या डहाळ्या त्या पाण्यांत पडल्या होत्या, सुकलीं पानें पडलीं होतीं. झऱ्याच्या आसपास झाडांझुडपांची दाटी झाली होती. त्या दाटीचेंच पुढें अरण्य होत गेलें होतें. शिकारीच्या जनावरांचें माहेरघरच येथें होतें. झऱ्याचें पाणी प्यायचें, दुपारच्या भाजत्या उन्हाच्या वेळीं सूर्यरहित जंगलाच्या नीलछायेंत थंडथंडगार नरम काळ्या मातींत बैठक मारून जिभा बाहेर काढून धांपा टाकीत राहायचें असा या जनावरांचा खाक्या !

राजूया जंगल तुडवीत पुढें पुढेंच चालला होता. वेताच्या कांड्यांनीं त्याचें शरीर खरचटत होतें, रक्त गळूं लागलें होतें, पायाखालीं गवत सळसळत होतें. पाय गुडघ्यापर्यंत चिखलानें माखून गेले होते. शिकारीचा शोध घेत तो चालला होता; पण शिकार होती कुठें ?

झर--झर—झर

त्या बाजूचें जंगल हललें. एक जनावर झपाट्यानें चाललें होतें. ' आली –संधि आली ! ' या विचारानें राजूयाला हांक दिली. राजूयाच्या शरीरांतल्या पेशी कठीण झाल्या. ज्वरतप्त शरीरांतल्या नव्या रक्तानें साद दिली. लागलीच

त्यानें नेम धरला–आणि तीर सोडला. शब्दभेदी कला त्यानें संताळ परगण्यांतच आत्मसात केली होती. त्या कलेचा त्यानें आतां उपयोग केला.

तीर सुटला आणि लागलीच गगनभेदी गर्जना ऐकूं आली. जणूं जंगलांत एक भयंकर स्फोटच झाला! शालवृक्षांनीं भीतीनें जणूं किंचाळयाच फोडल्या. रानकोंबडया चोहों दिशांस धांवत सुटल्या, आणि जंगल फोडून सुमारें आठ हात उंचीवरून एक विराट सोनेरी आगीच्या लोळानें राजूयाच्या अंगावर उडी टाकली; आणि लागलीच जंगल दुमदुमून गेलें. हा वाघ अस्सल बंगाली वाघ होता! राजूया झऱ्यानजीकच्या चिखलांत–गवता-चिखलांत धाडकन् कोसळला!

× × × ×

चहाच्या मळयांतील कामगारांनीं राजूयाला संध्याकाळीं जंगलांतून उचलून आणलें. वाघानें झडप घालून लचके तोडल्यामुळें राजूयाच्या डाव्या कुशींतलें मांस नाहींसें झालें होतें. हाडें बाहेर पडलीं होतीं. एका बाजूचे गाल वाघानें खाऊन टाकले होते, रक्तानें माखलेले दांत त्यांतून दिसत होते. त्याच्या तोंडाकडे बघवत देखील नव्हतें. जंगलच्या राजाच्या एका झडपेसरशीं जें जें कांहीं व्हावयाचें होतें, तें तें होऊन चुकलें होतें !

चहाच्या मळयाचे बाबूलोक राजूयाला बघायला आले. मधुबाबू पडले कनवाळू ! ते डॉक्टरना म्हणाले, " डॉक्टर, आपण अँटी-टिटानस सिरम दिलंत तर—"

डॉक्टर हंसले—त्यांच्या हंसण्यांत कारुण्य भरलें होतें !

ते म्हणाले, " मधुबाबू, अँटी–टिटानस सिरम आणायचं कुठून? स्ट्रेप्टोकोक्कस तरी कुठं आहे ? युद्धाच्या बाजारांत डिस्पेन्सरींत कांहीं शिल्लक तरी उरलं आहे का ? त्यापेक्षां मी सांगतों तसं करा. एक बैलगाडी आणवा, राजूयाला त्यांत घाला नि उद्यां सकाळीं शहर हॉस्पिटलांत द्या पाठवून-गॅंग्रीन नाहीं झालं तर वांचेलहि कदाचित् !"

मधुबाबू उद्गारले, " राजूया साला अगदीं शंभर टक्के बेवकूफ ! अंगांत काडीची शक्ति नाहीं नि निघाला लेकाचा शिकार करायला ! ती तरी कुठं ? या अजगरासारख्या जंगलांत ! समजून उमजून करंट्यानं मरण ओढवून घेतलंन् झालं ! "

मिटूं पाहणाऱ्या डोळ्यांनीं राजूयानें एकवार पाहून घेतलें–डोळे फाडून पाहण्याचा प्रयत्न त्यानें केला. त्याला कांहीं समजत नव्हतें. मॅनेजर बाबू एकाद्या अस्पष्ट सावलीसारखे दिसत होते. मधुबाबू, स्त्रीपुरुष कामगार, आणखी किती तरी माणसें त्याला अस्पष्ट सांवल्यासारखींच भासूं लागलीं !–आणि तें तेथें पलीकडे कोण ? टूनी कीं काय ?—होय कीं ! टूनीच ?

पण काय आश्चर्य ! टूनी हंसत नाहीं आहे ! तिच्या चेहऱ्यावरचें हंसूं मावळलें आहे; डोळ्यांतला खेळकरपणा, खोडकरपणा लोपलाय्. किती करुण, उदास, हताश नजरेनें पाहत आहे ती—!

एक लांबच लांब सुस्कारा सोडून राजूयानें पुन: डोळे मिटले ! कायमचेच !

नदीपलीकडे मोठ्या जंक्शनानजीक लष्करी वसाहत. समोर सुमारें ६०-७० बिघे जमीन. उजाड, कधीं लागवड न केलेली; निसर्गाच्या शापानें मृतवत झालेली जमीन होती ती. धनधान्य तर राहोच, मूठभर कोथिंबिरदेखील त्या जमिनींतून उगवणें कठीण.

जगांत सर्वांत जास्त प्राणशक्ति गवतांत असते. असलें रानगवत--विवर्ण, कुसांनीं भरलेलें रानगवत या माळावर इतस्ततः पसरलेलें होतें. हाडें बाहेर आलेलीं, गुरें भुकेनें व्याकळून जाऊन कांहीं तरी खायला मिळेल कीं काय याचा शोध करण्यासाठीं तेथें जात. गवत दिसतांच मोठ्या आशेनें तीं गुरें खाऊं लागत; पण, बाणाच्या तीक्ष्ण टोंकांसारखीं गवताचीं कुसें लागून त्यांच्या तोंडांतून टप टप टप टप ऊष्ण रक्त गळे. आणि ती जमीन तहानलेल्या माणसासारखी तें रक्त एका घोटांत शोषून घेई.

तीच ही जमीन. या जमिनींत आतां लोहाराचे हातोडीचे घाव पडत आहेत. खेडवळ माणसें दुरूनच या नव्या वसाहतीकडे आ वासून पाहत राहतात. या जमिनींत ठिकठिकाणीं पांढऱ्या राहुट्या पडलेल्या आहेत. झोंपड्या उभारल्या गेलेल्या आहेत. जेथें कांहींहि नव्हतें, तेथें बघतां बघतां आकाशांतून जणूं मायापुरी अवतरली आहे. रात्रीच्या वेळीं तर विद्युत्दीपांनीं ही नगरी किती ऐटीनें मिरवत असते.

या लष्करी वसाहतींतील सैनिकांकडूनच रोज पांचशें अंड्यांची मागणी. इतकीं अंडीं तरी मिळालींच पाहिजेत. पण, मिळणार कोठून? पोटाची खळगी भरण्यासाठीं खेडुतांनीं आपल्या कोंबड्या विकून टाकल्या. तीन तीन गांवें धुंडाळून दहा-वीस अंडीं मिळणें कठीण जातें. या साऱ्याचा विचार मनाला खाऊं लागला कीं, प्यारीलालचें मस्तक भणाणून जाई. त्याला वाटे,

‘ माणसांना कां नाहीं अंडीं घालतां येत ? घोडयांना कां नाहीं घालतां येत ? त्यांना तीं घालतां आलीं तर पांचशें ऐवजीं पन्नास अंडयांनींच या वसाहतींतल्या सैनिकांचीं राक्षसी पोटें, भरतां येतील.’

नाताळ जवळ येत आहे. Happy New Year. त्या वेळीं ख्रिसमस केक हवेत; नव्या वर्षाची मेजवानी हवी; म्हणून पांचशें ऐवजीं एक हजार अंडयांची मागणी आली आहे. ‘ हजार अंडीं !’ प्यारीलाल स्वत:शींच बडबडूं लागला. रात्रंदिवस सदान्‌कदा दु:स्वप्नासारखीं त्याला अंडींच अंडीं दिसूं लागलीं. रात्रीं झोंपेंत पडल्या पडल्या त्याला स्वप्नें पडत, आकाश दिसे. पण अकाशांत तारे दिसण्याऐवजीं मोटमोठ्या अंडयांची– प्रकाशमय अंडयांची रांकच रांक दिसे. जमिनीवरून माणसें चालण्याऐवजीं हातपाय असलेलीं अंडीं चालतांना दिसत ! अगदीं लष्करी थाटांत मार्च करीत तीं चाललेलीं आहेत– राइट, लेफ्ट; अबाउट टर्न; क्विक मार्च करीत चाललेलीं आहेत–असें त्याला दिसे ! !

असाच एके दिवशीं तो बिछान्यावर पडून राहिला होता. अंडीं कोठून आणायचीं या रागानें तो हवेंत हातपाय हलवूं लागला. त्याच्या मनांत आलें, ‘ कोंबडयांच्या अंडयांचा पुरवठा करण्याऐवजीं, कावळ्या-बगळ्यांचीं, कबुतरांचीं अंडीं पुरविलीं तर काय होईल ? हे लष्करी लोक बंदुकीच्या गोळ्यानी तोफांचे गोळे देखील सहजासहजीं पचवून टाकतात; मग कावळ्या-कबुतरांचीं अंडीं त्यांना न पचायला काय झालें ?—अरे हो ! पण तीं अंडीं तरी कशीं मिळायचीं ? रेल्वे लाइनच्या कडेस बसून कावळे, गिधाडें, सापा-कुत्र्यांचें मांस टोंचून टोंचून भांडत भांडत खात असत. टेलिग्राफच्या तारांवर खालच्या नदीच्या पाण्यांतील माशांवर झडप घालतां यावी म्हणून बगळे देखील ध्यानस्थ बसत असत. पण तो जमाना आतां गेला. मिलिटरी टारजेटचें प्रॅक्टिस करण्यासाठीं या गोऱ्या सैनिकांनीं त्यांना जवळ जवळ निर्वंश करून टाकलें. किती कठीण आला काळ ? या बिकट समयीं माणसेंच अंडीं घालूं शकलीं तर––तर या मोठ्या आपत्तींतून आपला बचाव होईल असें प्यारीलालला वाटलें.

आज सकाळींच मेजरसाहेबांनीं त्याच्या पाठीवर हात मारून ही हजार अंडयांची ऑर्डर दिली. हंसत हंसत त्यांनीं फर्मावलें, “ ट्राय, ट्राय-गुड बॉय ! ट्राय अगेन !! ”

या हुकुमानें प्यारीलालचा जीव अगदीं रडू रडू झाला होता. पण साहेबाच्या समोर रडायचें कसें ? रडलें तर भ्याड, भेकड म्हणून बंगाल्यांची नाचक्की होईल.

प्यारीलाल उठला आणि अंड्यांच्या शोधार्थ निघाला.

हिंवाळ्यांतील सकाळ. सारें आकाश जणूं मेघांची चादर लपेटून घेऊन मूर्च्छित पडलेलें. मधून मधून टप् टप् खालीं उड्या घेण्याचा प्रयत्न दंव करीत होते. तोंच सोसाट्याचा वारा येई आणि दंवबिंदु दिशोदिशीं उडून जात. पायाखालीं गवत गारठून गेलेलें. थंडी इतक्या कडाक्याची कीं शरीरांतलीं हाडें आणि स्नायु सुटून अलग अलग होऊन पडतील कीं काय असें वाटे.

प्यारीलालनें गरम गरम कपडे अंगावर चढविले. लोकरीचे हातमोजे घातले. डोक्यावरला मफलर कानावरून गळ्यापाशीं घट्ट बांधला. नंतर फिक्या निळ्या रंगाचा जाड जाड ओव्हरकोट चढविला. त्याच्या मनांत आलें—"बस. आतां आपल्या आसपास फिरकायची थंडीची काय बिशाद लागून राहिली आहे ?"

प्यारीलालनें ओव्हरकोटावर हलकेच प्रेमळपणानें हात फिरविला. त्याच्या मनांत आलें, " खरंच. काय नामी–अस्सल चीज आहे ! काश्मीरी लोंकर जितकी मुलायम तितकीच गरम ! एकदां अंगावर घेतली कीं पाहायला नको ! बंगालच्या थंडींतच काय, पण उत्तर ध्रुवावर देखील जाऊन निश्चिन्त राहावं ! या युद्धकाळांत दोनशें रुपये देऊनहि असा कोट नाहीं मिळायचा ! बोलून चालून मिलिटरी माल ! पक्का माल—!"

कोट घालतां घालतां प्यारीलालचें मन अकारणच अत्यंत आनंदानें फुललें ! " जीवनांत कोणतंच दुःख निर्भेळ दुःख नसतं ! त्यांतहि थोडं सुख सांत्वन असतंच. विटंबनेंत देखील थोडंसं सांत्वन असतंच. मेजर साहेबांची अंड्यांची मागणी—किती घाबरवून टाकणारी—पण हा कोट—सुंदर कोट त्यांनींच बक्षिस दिला हें विसरून चालायचं नाहीं !" प्यारीलाल मनाशींच म्हणाला, " मेजरसाहेबांचं कृतज्ञ असणं हेंच कर्तव्य आहे माझं ! त्यांचे उपकार फेडणं, उतराई होणं हेंच माझं कर्तव्य आहे !"

पण लागलीच त्यांच्या मनांत आलें—"हो–पण अंडीं कुठं आहेत? कुठं मिळणार?" अल्लाउद्दिनच्या जादूच्या दिव्याचा तो राक्षस जर आतां माझ्यासमोर येऊन उभा राहील तर––तर त्याला एकच विनंति करायची––"अंडीं आण! कुठूनहि आण, कितीहि आण–मिळतील तितकीं आण! मला ऐश्वर्य नको—पैसा-अडका नको, चीन देशांतील नकटी राजकन्याहि नको—हवींत अंडीं–नुसतीं अंडीं! तीं जमवितां नसतील येत तर, तर—तर तूं अंडीं घाल! एक नव्हे, दोन नव्हे, शंभर नव्हे, हजार-हजार, लक्ष-लक्ष, कोटी-कोटी, अब्ज–अब्ज!!"

हिंवाळ्यांतली संध्याकाळ. मेघांची चादर लपेटून घेऊन सारें आकाश जणूं मूर्च्छित झालेलें होतें! मधून मधून पावसाचे थेंब आकाशांतून उडया घेण्याचा प्रयत्न करीत–तोंच वारा सुटे, पाण्याचे थेंब दशदिशांत उडून जात! पायाखालीं गवत–कुठल्या आशेवर जगत होतें बिचारें कोण जाणें! थंडी तर इतकी कडाक्याची कीं—अंगांतलीं हाडें–मांस–अलग अलग होऊन पडतात कीं काय अशी धास्ती वाटत होती.

प्यारीलालनें अंगांत कपडे घातले. हातांत हातमोजे चढवले. पायांत पायमोजे चढवले–मफलर कानावर, गळ्यावर, घट्ट बांधून घेतलें. आणि नंतर फिक्या–निळया रंगाचा मोठा ओव्हरकोट त्यानें चढवला. जणूं स्वतःशींच तो म्हणाला––"बस्स! आतां माझ्या आसपास फिरकायची तरी थंडीची काय टाप लागून राहिली आहे!"

"अंडीं पाहिजे आहेत––अंडयांचा पर्वत उभा कर! त्या पर्वताच्या शिखरानं माउंट एव्हरेस्टलाहि लाजवलं पाहिजे!"

पण त्या पक्षाच्या पंखांबरोबरच ते दिवस देखील कायमचे उडून गेले आहेत.

एक कातर लांबच लांब सुस्कारा सोडून प्यारीलाल बाहेर आला.

थंडीनें कांकडून गेलेला माळ. गवताचीं कुसें थंडीनें सुरीच्या पात्यासारखीं तीक्ष्ण झालेलीं! माणसाचा उघडा पाय त्यावर पडला कीं आटोपलेंच! लागलीच रक्त वाहायला लागायचें त्यांतून! तरी देखील माणसें उघडया पायांनींच त्या गवतांतून जात! त्यांच्या पावलांना नारूसारखीं क्षतें पडलेलीं. कातडीचा रंग जळक्या लाकडासारखा काळा. नखें जणूं कोणी हातो-

डीनें चेंचून टाकल्यासारखीं ! अशा या गवती माळांतून अशीं हीं माणसें फिरत. तीक्ष्ण गवती कुसें, माणसाच्या रक्तानें माखून जात !

प्यारीलालहि त्याच माळांतून वाट काढीत पुढें चालला. त्याच्या पायांत उंची पेटंट लेदरचे बूट होते. अंगांत ओव्हरकोट होता, त्या ओव्हरकोटावर हिमकण जमत चालले होते. माथ्यावर ढगाळलेलें आकाश होतें; त्यांतले ढग पृथ्वीवर कोसळून पडण्यास आतुर झालेले दिसत होते.

सुमारें मैलभर असली ही वाट चालून गेल्यानंतर गांव. गांव आहे म्हणण्याऐवजीं होतें म्हणणेंच योग्य ठरेल. दुष्काळाच्या अनर्थाच्या त्या गांवावरील खुणा अद्यापि बुजलेल्या नव्हत्या. कोसळलेलीं छपरें, भंगलेलीं घरें, उजाड झोंपड्या ! दुष्काळांत "अन्न" "अन्न" करीत मेलेल्या लोकांच्या दीर्घ श्वासानेंच जणूं कळकीचीं पानें उडून रस्त्यावर ढीगचे ढीग करून पडून राहिलीं होतीं.

"रजनीऽऽ--अरे रजनीऽऽऽ--आहेस का घरीं ?" प्यारीलालनें चढेल आवाजांत विचारलें.

एका मोडक्या झोंपडीवजा घरासमोर उभा राहून प्यारीलालनें हांक दिली. घरच्या भिंती मातीनें लिंपलेल्या. त्यावर शंख, पद्म, लता यांचीं चित्रें काढलेलीं. एके काळीं या घरांत समृद्धि होती असेंच जणूं तीं गर्जून सांगूं पाहत होतीं. त्या मातीच्या चार भिंतींवर पत्र्याचें छप्पर; पत्र्याचा रंग उडालेला; भोंकें पडलेलीं. त्या भोंकांतून आकाश त्या घरांत डोकावीत होतें; घरांतल्या धुराचे लोट आंतून बाहेर पडूं पाहत होते आणि बाहेरल्या धुक्याचे लोट बाहेरून आंत शिरूं पाहत होते !

"रजनी, अरे रजनी--आहेस का घरीं ?"

"ठेकेदार बाबू हाक देताहेत." शारदेनें सांगितलें.

"आलों हं, बाबूसाहेब--आलोंऽऽ" असें म्हणत म्हणत थरथर कांपत म्हातारा रजनी बाहेर आला. उपासमारीमुळें पिसाटासारखा शून्य झालेला त्याचा चेहरा. त्याचे डोळे पिवळट, जणूं आपलें कांहीं तरी हरवलें. त्याचा शोध घेत फिरत असलेले ! हनुवटीखालीं अस्ताव्यस्त पिकलेली दाढी ! अंगावर शंभर ठिकाणीं फाटलेलें एक घोंपटें लपेटून म्हातारा थर-थरू कांपत होता. बिचारा दुसरें काय करणार ! या वर्षीची थंडीच तशी

कडक. त्याच्या हाताचीं बोटें देखील थंडीच्या कडाक्यामुळें निळीं निळीं झालेलीं दिसत होतीं.

" काय म्हातारबाबा, ठीक चाललंय् ना ? " चिरूट शिलगावीत प्यारी-लालनें विचारलें. हा अर्थात् शिष्टपणा होता, आपला मतलब साधण्या-साठीं--गोड प्रस्ताव होता !

" ठीक--ठीक ! " म्हाताऱ्यानें हंसण्याचा प्रयत्न करीत म्हटलें, "आम्हां लोकांचं आणि ठीक ? अजून मेलेलों नाहीं हेंच ठीक म्हणायचं तर म्हणावं ! "

"कां असलं अभद्र बोलतां, म्हातारबावा ?" पावलांनीं ताल धरीत धरीत, तोंडांतून चिरूटाचीं वलयें हवेंत सोडीत प्यारीलाल बोलूं लागले, " ही लढाई आतां संपेल; पुन्हा एकवार पिकं तरारून येतील; जिकडे तिकडे सुख हंसूं लागेल, शांतता नांदूं लागेल ! "

प्यारीलालचा आवाज अगदीं देवदूतासारखा उदात्त होता; त्या उदात्त-तेनेंच तो म्हणाला, " आणि तसं झालं कीं आपला हा बंगाल देश पुन्हा एकवार सोन्याचा देश होईल--सोनार बांगला !—सोनार बांगला ! "

हें आपलें म्हणणें प्यारीलालला स्वतःलाच फार मधुर वाटूं लागलें. त्याच्या मनांत आलें, खरेंच, मधून मधून खुद्द सरस्वतीदेवीच माझ्या जिव्हाग्रावर येऊन नाचत असली पाहिजे; आपली स्वर्गीय नजर म्हाताऱ्या रजनीवर टाकून त्याला मंत्रमुग्ध करण्याचा प्रयत्न प्यारीलाल करूं लागले.

पण तरीहि म्हातारा हंसतच होता ! पडक्या दांताच्या कवळींतून म्लान खिन्न हंसूं बाहेर पडलें ! " सोनार बांगला ! कधीं होता हा बंगला सोन्याचा ? रक्ताचं पाणी केल्यावांचून आणि डोळ्यांतून आंसवं गाळल्या-वांचून आम्हाला कधीं दोन घांस तरी खायला मिळाले आहेत का ? कध्धीं नाहीं ! आज तर मिळतच नाहींत ! युद्धापूर्वी—दहा वर्षांआधीं देखील कधीं मिळाले नाहींत ! आमच्या नशिबीं सदा-न्-कदा तेंच जिणं ! बेगार, होती, ठाण्याचे दरोगा, शेतावरून काढून टाकायची नोटिस—हींच नेहमीं आमच्या नशिबीं ! आणि आतां तर काय ? आमचे हाल कुत्रीं देखील खायचे नाहींत ! दुःखाचा पेला आतां कांठोकांठ भरलेला आहे ! दोन मुठी भात देखील आतां अदृश्य झालं आहे ! लज्जेनं आणि अपमानानं

भरले त्या जाडया भरडया लाल तांदळाचा भात आणि रानपाल्याची भाजी हेंच का तुमच्या सोनेरी बंगालचं रूप ?--असेल--असेलहि कदाचित् !"

पण गारठून टाकणाऱ्या थंडींत आतां त्याच्याच्यानें उभें राहवेना. थंड वारे सुटले होते, हाडें कांपत होतीं, आपल्या अंगाला लपेटलेलें धोंपटें जणूं बर्फमय झालें आहे असें त्याला वाटलें. त्याच्या मनांत आलें आणि अशा या स्थितींत हा प्यारीलाल व्याख्यान झोडतो आहे—सोनार बांगलाच्या सोनेरी भवितव्याबद्दल ! चिरूटाचा धूर चक्राकार होऊन त्याच्या माथ्यासभोंवार स्वर्गीय वलयें उभवीत आहे--त्याच्या लोंकरी कोटावर हिमकण जमत आहेत, चकाकत आहेत—जणूं अशरीरि प्रकाशच पसरत आहे !

प्यारीलालनें सूतोवाच केलें, " म्हातारबाबा, तुम्ही अंडीं द्या आम्हाला जमवून !"

" अंडीं ! हरे राम ! अंडीं मिळणं कठीण आहे, बाबू !"

" कठीण बिठीण कांहीं नाहीं चालायचं !" त्या स्वर्गदूतानें पुनः एकवार आपली नजर रोखून म्हाताऱ्याला वश करून घेण्याचा प्रयत्न केला, " म्हातारबाबा, पैशाची फिकीर नका करूं--त्यासाठीं अडवून नका धरूं !"

" पण अंडीं मिळणार कुठून ?" दांत खटखटावीत म्हाताऱ्यानें म्हटलें, " आणि त्यांत ही थंडी. घरांतून बाहेर पडूं नयेसं वाटतं. पडलं घराबाहेर कीं हातपाय फाटून जातील; आणि थंडींत या पावसाची भर !"

" अरे वा ! अरे वा !!" प्यारीलाल म्हणाला, " तुझ्या अंगावर इतकी ऊबदार गोधडी दिसत्येय् आणि तुला कसली रे थंडी ? भलती बाबूगिरी नको करूं. हे घे रुपये. अडीच रुपये डझनामागं उद्यां कमीत कमी तीन डझन अंडीं जमवून आण. कुठूनहि आण. कशींहि आण. पण आणच आण !"

चिरूटाचे फवारे हवेंत मिसळत होते. त्या वलयांकडे पाहतां पाहतां आपलें डोकें गरगरां गरगरां फिरत आहे असें म्हाताऱ्या रजनीला वाटलें. आपलें सारें शरीर बधिर होत आहे आणि डोळ्यांसमोर धुराचीं वलयें नाचत आहेत असें त्याला दिसलें.

" बाबूसाहेब, मी वचन देत नाहीं; पण प्रयत्न मात्र करतों."

" प्रयत्न बियत्न कांहीं नाहीं. अंडीं पाहिजेत नी तीं उद्यांच पाहिजेत. नाहीं आणलींस तर याद राख; सांगून ठेवतों !" भारी बुटांचा आवाज करीत प्यारीलाल तेथून निघून गेला.

घरांत पोराबाळांचीं दुखणीं काढतां काढतां शारदेला जीव नकोसा झाला होता. आठ वर्षांचें पोर मलेरियानें हैराण झालेलें. रोज रोज क्षणोक्षणीं मलेरिया जणूं त्या पोराला खाऊन टाकीत होता. पोराचें पोट फुगलेलें. कॅल-शियम नसल्यामुळें हाडें दुबळीं झालेलीं. जरा धक्का लागला कीं मोडून पडतील, अशी त्यांशी गत. अंगावर चिंध्या चिंध्या झालेली गोधडी. त्या गोधडींत तें पोर थंडीनें कुडकुडत होतें. फुटक्या थाळींतील भाताचीं शितें मधून मधून तोंडांत भरीत होतें. गरिबा घरचें, कोरडा भातहेंच मलेरि-याचें पथ्य !

शारदेच्या अंगावर दूधपितें मूल. त्याला सरदी झालेली. मधून मधून खोकत होतें तें. आईचे स्तन सुकून गेलेले. ओढलें तरी दूध तर राहोच, पण थेंबभर रक्तदेखील त्यांतून निघणें कठीण. शारदेच्या अंगावरलें लुगडें—लुगडें कसलें—शंभर गांठी बांधून कशीबशी लाज राखण्यापुरती व्यवस्था त्या लुगड्यानें होत होती, एवढेंच. थंडीपासून बचाव कुठला व्हायला ? तरी या कडाक्याच्या थंडींत पोरीला छातीशीं कवटाळून अंगाची ऊब देऊन पोरीचे प्राण वांचवायचे प्रयत्न शारदा करीत होती.

शारदा ही म्हाताऱ्या रजनीची सून. म्हाताऱ्याचा मुलगा निवारण. तो रिक्शा चालविण्यासाठीं शहरांत गेलेला. आज दोन महिने झाले. गांवांत पोट भरत नाहीं म्हणून शहरांत गेला. पण, या दोन महिन्यांत त्याची खबर नाहीं.

म्हातारा घरांत आला. त्यानें विडी शिलगावली. अंगावरची गोधडी उतरवून ठेवली. फाटकें कुडतें अंगावर चढविलें. त्यावर गोधडी लपेटून घेतली. तरी थंडी जाईना. आराम वाटेना.

" सूनबा ,ईशेगोटी पेटवून आण. थंडीनं गारठून गेलों बघ."

" शेगोटी—पेटवूं कशानं ? घरांत का कोळसे आहेत, कीं लांकडं आहेत ? माझीं हाडं उरलींत नुसतीं. तीं पेटवून ठेवूं का तुमच्यापुढं ? "

" कां ? त्या काटक्या आहेत—"

" हो—आहेत बरं—आहेत ! दिवसाढवळ्या टाकल्यात साऱ्या जाळून, तर रात्रीचं कसं ? रात्रीं कडाक्याची थंडी पडेल—नि पोरंबाळं कांकडून जातील !"

म्हातारा रागानें थरथर कांपूं लागला ! तो ओरडला, " बाजाच्या राणी-सारखं घरांत बसलं नाहीं तर चालायचं नाहीं वाटतं ? हरामजादी कुठली ! बाहेरून काटक्या गोळा करून आणतां येत नाहींत वाटतं ?"

शारदा मोठ्यानें फणकारली; " काटक्या ! काटक्या काय आकाशांतनं पडतात ? थेरड्या, तूं मरणार असलास तर तुला जाळण्यासाठीं जमवीन काटक्या ! "

म्हाताऱ्या रजनीला आतां मात्र असह्य झालें. आपण कांहीं तरी करावें, असें त्याच्या मनांत आलें. पण त्यानें केलें नाहीं कांहींच ! अंगावरली गोधडी अंगाशीं अधिकच लपेटून घेत तो शिथिल गतीनें घराबाहेर चालूं लागला !

" आत्तां—या वेळेस कुठं चाललां पुनः ?"

" मरायला !"

म्हातारा दरवाजाबाहेरून ओरडला, " माझ्या मरणाचीं लांकडं जमवून ठेव ! "

बाहेर थंडी एकाद्या प्रचंड पाषाणासारखी पृथ्वीच्या छातीवर बसली होती ! आकाश ढगाळून आलें होतें. पांडुर अंधार जणूं चहों दिशांत पसरत होता.

बधिर पावलें टाकीत रजनी पुढें चालला. त्याच्या पावलांतून भुकेल्या वंध्या जमिनीवर रक्त गळूं लागलें !

रजनी परत आला तेव्हां सांज झाली होती. त्याची फेरी फुकट गेली नव्हती. तीन गांवें हिंडल्यानंतर चाळीस अंडीं मिळालीं. ठेकेदार बाबूंच्या नांवाचा दरारा ! हंस–कोंबडीं देखील खूष होऊन अंडीं घालूं लागायची ! डझनामागें तीन आणे कमिशन जरी प्यारीलालनें दिलें, तरी कमींत कमी दहा आणे तरी पदरीं पडतील !

दहा आणे ! तीन चार माणसांच्या एक वेळची भाजीभाकरीची सोय ! नाहीं म्हटलें तरी प्यारीलालची मेहरबानीच आहे माझ्यावर—ती नाकबूल करणें अधर्म होईल. प्यारीलाल अधून मधून वांकड्या नजरेनें पाहतो शारदेकडे—तें वगळलें तर नांव ठेवण्याजोगें—कांहीं नाहीं त्याच्यांत !

पण दहा आणे! दहा आण्यांसाठीं किती घाम गाळावा लागला! पायांची चाळण झाली नुसती! दोन्ही पाय बधिर होत चालले आहेत--थंडीनें नाक वाहतें आहे—त्यांतच डोळ्यांतल्या आंसवांचें पाणीहि मिसळत आहे!

पण घरांत पाऊल टाकतांच म्हाताऱ्याचें मन प्रसन्न झालें.

रजनीनें शेगोटी पेटवून ठेवली होती. बाहेरल्या शीतजर्जर जगाच्या निष्ठुर तावडींतून जणूं आपण स्वर्गोतच आलों, असें त्याला वाटलें. थोड्या वेळापूर्वी झालेल्या भांडणाचा त्याला पार विसर पडला. एकाद्या लोभी माणसासारखा तो शेगोटीजवळ बसला व शेगोटीच्या लाल लाल शिखांवर तो आपले हात पाय शेकूं लागला!

आग--लाल लाल! रंग जणूं रक्तासारखा! माणसांच्या हृदयांतलें जें रक्त सुकून गेलें, तेंच जणूं आगीच्या रूपानें व्यक्त झालें. सारें घर लाल लाल छायेनें आच्छादून गेलें होतें. शारदेचा चेहराहि विचित्र अपरिचित वाटत होता! म्हातारा रजनो शेगोटीवर दोन्ही पाय शेकीत स्वस्थ बसून राहिला.

एरवीं असा तो शेकीत बसला असता तर जळून राख झाली असती पायांची-पण या कडाक्याच्या थंडींत धगधगलेली आग देखील पुरेशी ऊब-दार नाहीं असें वाटत होतें म्हाताऱ्याला!

शारदेनें विचारलें, "मिळालीं का अंडीं?"

"हो—मिळालीं चाळीस! सूनबाई, नीट सांभाळून ठेव तीं! ठेकेदाराला दिलीं पाहिजेत सकाळीं! उद्यां सकाळीं दहा आणे मिळतील आपल्या हातीं—!"

मलेरियानें खंगलेल्या पोरानें काकुळतीनें म्हटलें, "आई, मला एक अंडं हवंय् खायला!"

"खबरदार! खबरदार!" रजनी वाघासारखी गरजली, "म्हणे अंडं खाणार! हात तरी लाव मेल्या—एका डोक्याचीं दोन डोकीं करतें कीं नाहीं बघ!"

पण त्या पोराचें कण्हणें, विव्हळणें थांबलें नाहीं. फारां दिवसांच्या आजा-रानें त्याची भूक वाढली होती--त्याच्या पोटांत कावळे ओरडत होते! त्याचे डोळे भुकेल्या लांडग्यासारखे दिसत होते.

" मला भूक लागलीय् ग आई ! मी खाणार अंडं !--खाणार--खाणार--खाणार ! "

शारदेनें मुलाला प्रेमभरानें छातीशीं कवटाळलें व त्याला थोपटीत गोंजारीत म्हटलें, " बाळ, अंडीं खाऊं नयेत आपण ! आपण गरीब आहोंत ना ?--गरिबांनीं अंडीं नाहीं खायचीं ! "

रजनीबाबू तसाच निमूटपणें गप्प बसला. त्याचें मन जड झालें होतें, सुन्न होऊं लागलें होतें ! गरिबांनीं अंडीं खायचीं नसतात ! नुसतीं अंडींच कां ?—कांहींही खायचें नसतें !...गरिबांना खायला मिळालें तर जग कसें चालेल ? जग उलथेंच्या पालथें होऊन जाईल कीं !

मुलगा अजूनहि रडतच होता.

रजनीचे हात शिवशिव करूं लागले. कांहीं तरी करावें, असें त्याला वाटत होतें. पोरट्याचा गळा दाबून टाकावा आणि त्याची ओरड कायमची थांबवून टाकावी असा विचार त्याच्या मनांत आला !..." खायला हवंय् म्हणे ! कशाला हवं खायला ?--आणि खायचं घेणार कोणाकडून ? स्वस्थ नाहीं बसवत कार्ट्याला ? भुकेनं सुकून वाळून मुकाटपणं मरतां नाहीं येत ? मेलं कार्टं तर--तर सुटका तरी होईल--जगाला हाडं तरी मिळतील ! "

एका थाळींत भात-भाजी वाढून शारदेनें ती थाळी रजनीदापुढें ठेवून म्हटलें, " घ्या जेवण आटोपून ! "

थंडगार झालेला, अर्धवट शिजलेला भात-कडू कार्ल्यांची भाजी ! घशाखालीं एक घांस उतरला कीं पोटांतून थंडीची थरथर उठे नि मस्तकापर्यंत जाऊन भिडे ! दांतखिळी वाजूं लागे ! कां कोण जाणें--पण म्हाताऱ्या रजनीलाही त्या पोराप्रमाणेंच अंडें खाऊन टाकायची लहर आली ! त्याच्या मनांत विचार आला--" किती तरी दिवसांत अंडं खाल्लेलं नाहीं आपण ! "

पण तीं अंडीं--खायच्यासाठीं नाहींत--तीं आहेत ठेकेदारबाबूसाठीं. साहेब लोकांचें नवें वर्ष येतें आहे, त्यांचा उत्सव व्हायचा आहे, खाणें-पिणें व्हायचें आहे ! हीं अंडीं त्याखातर आहेत-त्यांच्याखातर आहेत. त्यांवर नजर टाकणें हें सुद्धां महापातकच !

घांस तोंडांत घेववत नव्हते. पण मोठमोठाले घांस करून म्हातारा ते घशांत कोंबूं लागला. थंडीच्या कडाक्यामुळें पोटांत मुरडा येत होता--ओकून

जाईल कीं काय असें भय वाटत होतें--पण तरीहि तो घांसचे घांस घशाखालीं उतरवीतच होता !

इतक्यांत पोर पुन्हा केंकाटलें--आईऽऽऽमला अंडंऽऽऽ ! ”

म्हाताऱ्याला एकाएकीं काय झालें कोणास ठाऊक ! त्याच्या अंगांतला सारा राग--सारें रक्त मस्तकांत चढलें ! पुढयांतली थाळी त्यानें दूर भिरकावून दिली आणि नंतर विजेसारखा उठून उभा राहिला म्हातारा ! अंड्यांबद्दलच्या अतृप्त लोभाच्या ज्वाळेनें पेट घेतला होता--त्या ज्वाळेची भूक शमवायला त्याला निमित्त लाभलें होतें !

दांत कडकडावीत तो ओरडला, “ अंडं—पुन्हा अंडं ! थांब कारट्या—तुला--जिवानिशीं मारूनच टाकतों आतां ! ”

लागलीच त्यानें त्या पोराला जवळ ओढून घेतलें, त्याची मानगुटी धरली, आणि त्याचा गळा दाबीत तो ओरडला--“ मर कार्ट्या--मर ! ”

“ अहो, काय करतांहांत--” शारदेनें हंबरडा फोडला !

लाल लाल आगीच्या प्रकाशांत म्हाताऱ्याचे डोळे भयंकरच दिसत होते. आगीहूनही ते अधिक लाल दिसत होते--ती लाल नजर तिच्यावर रोखीत तो ओरडला,

“ निकाल लावून टाकतों कार्ट्याचा ! ”

“ सोडा-सोडा त्याला—मरून जाईल तें पोर !”

“ मरूं दे—खुश्शाल मरूं दे !”

म्हाताऱ्याच्या जबर हाताच्या दाबानें पोराचे डोळे बाहेर येऊं लागले होते.

हातांत लोखंडी सळी घेऊन शारदा धांवत धांवतच आली. आली-आणि अंगांतलें सारें बळ एकवटून तिनें त्या सळीचा तडाखा म्हाताऱ्याच्या माथ्यावर हाणला !

म्हाताऱ्यानें एक किंकाळी फोडली. पोराचा गळा सोडला—आणि तीन हात दूर जाऊन पडला—पडला तो नेमका आगींतच ! अग्निकण साऱ्या घरभर पिसाटासारखे नाचूं लागले !

शारदा विस्मित-विस्फारलेल्या डोळ्यांनीं नुसती पाहतच उभी राहिली. काय करावें हेंच तिला कळेना !

कांहींही हालचाल न करतां पोर जमिनीवर पडलेलें--आणि म्हातारा रजनी--आगीच्या शय्येंत माथा ठेवून तसाच पडून राहिलेला! त्याच्या अंगावरल्या धोपटयानें पेट घेतलेला होता. आगींत पडलेला साप जसा सारें बळ एकवटून शरीराला अखेरची गति म्हणून वेटाळून घेण्याचा प्रयत्न करतो--तशाच असाहाय्य प्रयत्नानें म्हाताऱ्यानें एकवार हालचाल केली आणि--मग--मग--तो तसाच पडून राहिला!

शारदा स्तंभित होऊन पाहतच राहिली--म्हाताऱ्याची दाढी जळत आहे—फट्-सा आवाज होऊन त्याचा डावा डोळा बाहेर येत आहे!

माणूस जळत असतांना किती दुर्गंध सुटतो!

माळापलीकडे उभा राहून संध्याकाळच्या अंधारांत प्यारीलाल पाहूं लागला—सारें गांव जळत आहे—या कडाक्याच्या थंडींत जणूं शेगोटी पेटलेली आहे! इतक्या दूर उभा असून त्याला एकाएकीं त्या कडाक्याच्या थंडींतही उकडूं लागलें--काश्मीरी लोकरीचा कोट फारच गरम वाटूं लागला!

सुशान्तनें आरामखुर्चीत अंग लोटून दिलें आणि थकल्या-शिणल्या स्वरांत म्हटलें, " बस्स झाले आतां युक्तिवाद !. माझ्या युक्तिवादानं कदाचित माझं म्हणणं तुम्हाला पटवतां यायचं नाहीं. त्यापेक्षां आमच्या म्हाताऱ्या आईची गोष्टच सांगतों तुम्हाला. ती ऐका. माझं म्हणणं त्या गोष्टींतून पटेल तुम्हाला कदाचित !

१९३८ सालची गोष्ट. त्या वेळीं आम्ही अंडरग्राउंड काम करीत होतों. आमच्या मागोमाग सरकारी हुकुम घेऊन सी. आय. डी.चे शिकारी ग्रेहाउंड पाठलाग करीत दर मिनिटाला पकडले जाण्याची धास्ती. पण कामही बंद ठेवणं शक्य नव्हतं. बंगालमधील खेडींपाडीं नुकतींच जागीं होऊं लागलीं होतीं. त्यांच्या नाडयांतून रक्तप्रवाह वाहूं लागला होता. आम्हाला वाटे, या वेळीं मागं राहिलों, तर सारी चळवळच दहा वर्षं मागं हटायची !

पण देशाला ओळखण्यांत आम्हीं चूक केलेली नव्हती. खेडयापाडयांत आमच्यासाठीं आसऱ्याचं, आश्वासनाचं आसन ठेवलेलं असे. असं आश्वासन मिळेल अशी त्या आधीं कल्पना देखील नव्हती ! आमचा शास्त्रीय समाजवाद त्या खेडुतांना अपरिचित होता. आमचं अर्थकारण त्यांना कधीं काळीं पटवितां येईल ही आशाही दुराशेंतच मोडण्यासारखी होती ! पण आपल्या खेडयापाडयांतलीं माणसं हीं नैसर्गिक माणसं असतात; त्यामुळं मानवाच्या हक्कांच्या साध्या सरळ गोष्टी त्यांच्यापर्यंत पोंचविण्यास आम्हाला वेळ लागला नाहीं. उलट आम्हालाच नवे धडे मिळाले. जाणीव झाली कीं मध्यम वर्गांतल्या आम्हाला बुद्धीनं, तर्कानं नि युक्तिवादानं जें कळतं तें सत्य जीवनाच्या प्रत्यक्ष मागण्यांमुळं त्यांना आपोआपच पटलेलं आहे ! त्यामुळं सरकारी शिकारी कुत्रे वास घेऊन तलास लावण्यांत कितीहि पटाईत

असले, तरी रेल्वेस्टेशनपासून व पोलिस ठाण्यापासून आठ–आठ, दहा–दहा मैल दूर अंतरावरल्या अनाथ, अज्ञात लहान लहान शेतकऱ्यांच्या गांवांत आमचा शोध लावणं केवळ त्यांनाच नव्हे, तर ब्रिटिश साम्राज्याच्या समस्त फौजेलाही साधलं असतं कीं काय याचीच शंका वाटे !

त्या काळीं आम्ही किसानांच्या खोपटांत आसरा घेत असूं. मजुरांबरोबर तंबाखू, खात असूं–हुक्का पीत असूं. मुसलमान गाडीवानांच्या घरीं कांदालसणीची चटणी नि भात खात असूं ! गोरगरीब नावाड्यांच्या होड्या सोडून रातोरात या तालुक्यांतून त्या तालुक्यांत जाऊन पोंचत असूं. आणि मग आमच्या सभा होत. पांच–पांच सात–सात मैल अंतरावरून, चिखलपाणी तुडवीत, नदीनाले ओलांडीत, मध्यरात्रीं आमचे लोक येत. सल्ला-मसलती होत. विवर्ण-मलिन-डोळ्यांवरलं वडस निघून जाई नि आगामी क्रांतीचे अग्निसंकेत त्या ठिकाणीं झळाळलेलं दिसूं लागत !

त्या वेळीं मी नि रजत राय एकत्र काम करीत असूं. रजत रायला तुम्हीं पाहिलेलं नाहीं. तो किसान समितीचं काम करी. एकदां असंच समितीचं काम संपवून मध्यरात्रीनंतर––परत येत असतांना त्याला साप चावला आणि तो मेला. रजत राय—किती हिंमतीचा तरूण ! त्याच्याबद्दल आज बोलणं व्यर्थ आहे ! शहरांत मिरवामिरवी करून, सभांत आरडाओरड करून हुतात्मे होणाऱ्यांपैकीं तो नव्हता ! त्यामुळं आज त्याची आठवणहि नाहीं कोणाला ! त्याची आठवण ज्यांना आहे, त्यांना व्याख्यानं झोडतां येत नाहींत, मोठमोठाले विद्वत्ताप्रचुर लेख लिहिण्याची कलाहि त्यांच्यापाशीं नाहीं. त्यामुळंच आज आपण रजत रायला विसरलों आहोंत अन् तें एकापरीनं स्वाभाविकहि आहे.

पण तें राहो. काय बरं सांगत होतों मी ?–हो, मी––नि रजत राय संगेंसंगेंच काम करीत होतों.

एके दिवशीं रात्रीं एका गवळीवाड्यांत आमची बैठक चालू होती. तोंच खबर मिळाली कीं सी. आय. डी.वाले येत आहेत. पोलिस ठाण्याच्या दरोगासाहेबांना कुठून तरी आमचा पत्ता लागला आहे अन् भारताच्या बादशहाकडून आम्हाला आलेलं निमंत्रण आमच्याकडे पोंचविण्यासाठीं दरोगासाहेब पोलिस पार्टीनिशीं येत आहेत !

मग काय् ! " चल मुसाफिर बांध गठरिया !" सोबत गांठोडं कोणाही-पाशीं नव्हतं; आणि पलायनपटु पाय तर तयारच होते. ते राजप्रतिनिधी येऊन पोंचण्याआधींच, त्यांच्या आशांची राखरांगोळी करून, अवघ्या तासाभराच्या आंत आम्हीं सहा मैल दूर अंतरावर जाऊन थडकलों !

आमची नि दरोगासाहेबांची वाट एकच नव्हती हें सांगायला नकोच ! अशा वेळीं डिस्ट्रिक्ट बोर्डाचे आणि लोकल बोर्डाचे रस्ते टाळणंच शहाण-पणाचं असतं. शेताचे बांध ओलांडीत, छातीभर तागाचीं शेतं ओलांडीत, नदीनाल्यांचा चिखल तुडवीत, अखेर आम्ही एका जंगलांत जाऊन थड-कलों, तेव्हां कुठं जीव भांड्यांत पडला ! त्या वेळीं आंब्याचीं, जांभळीचीं, वेळूंचीं झाडं असलेल्या त्या जंगलांत रात्रीच्या शेवटल्या प्रहराचा मधुर वारा वाहूं लागलेला होता. समोरल्या उंच पठारावर रानतुळशीच्या झाडाच्या माथ्यावर शुक्रतारा दिसत होता. फार दूरवर उडत असलेल्या एकाद्या पतंगा-सारखा त्याचा रंगीत प्रकाश दिसत होता.

दिशाफिशांचं भान त्या वेळीं आम्हाला उरलेलं नव्हतं. आम्ही एके जागीं बसलों आणि थकून गेलेल्या कुत्र्यासारख्या धांपा टाकूं लागलों. रजत दिसायला दुबळा, रोगट दिसे; पण त्याचं शरीर जणूं लोखंडानं घडवलेलं होतं ! तोहि माझ्यासारखाच थोडा थोडा धापा टाकीत होता हें खरं; परंतु थोडंसं ओझं थोड्या अंतरावर नेऊन ठेवल्यानं होतात त्याहून अधिक परि-श्रम त्याला झाले होते असं वाटत नव्हतं.

रजतनं तीक्ष्ण नजरेनं एकवार चोंहोंकडे पाहून घेतलं व म्हटलं " अरेच्चा ! वाटलंच होतं मला ! महुया डागाजवळच येऊन पडलों आहोंत आम्ही सुशान्त; ऊठ बाबा, असं बसून नाहीं चालायचं ! "

" छे रे बुवा, आतां नाहीं उठवत. माझा दम तर नाहींसा झालाय् !"

मला आश्वासन देत रजत म्हणाला, " फार दूर नाहीं रे चालयचं—फार तर मैलभर ! चल, तुला अशा झक्क जागीं घेऊन जातों कीं—खूषच होशील. बघ !—चल–आमच्या आईकडे !"

" आईकडे ! "

रजत हंसून म्हणाला, " हो—आईकडे ! तूं कधीं पाहिलं नाहींस वाटतं तिला ! चल, आज तुझी तिची ओळख देतों करून ! "

पहांट व्हायच्या आधींच आम्ही महुयाडांगा गांवीं पोहोंचलों. गांव अजून जागं झालं नव्हतं. झाडांच्या सांवल्या-सांवल्यांत अंधार अजूनहि झोंपून राहिला होता.

आम्ही एका घरापाशीं येऊन उभे राहिलों. मातीचा लेप दिलेल्या त्या घराच्या भिंती इकडे तिकडे भंगलेल्या दिसत होत्या. छप्पर उन्हापावसानं सडून काळं झालेलं होतं. एका बाजूस छोटंसं तळं होतं. त्याच्या आसपास तागाचीं झाडं होतीं. शेवाळ आलेलं त्या तळ्याचं तें पाणी—आणि आसपासची घाण--यांच्यामुळं सकाळचं वातावरण जणूं विषमय झालं आहे असा भास मला झाला.

दरवाजावर थाप मारीत रजतनं हांक मारली--" आई--अहो आई--!"

" कोण--कोण आहे रे ? " आंतून क्रुद्ध कर्कश आवाज ऐकूं आला.

" मी—आम्ही—"

" आम्ही--आम्ही कोण ? या रामप्रहरीं कोण आलंय् मला सतवायला ?"

" आई, दार उघडा ना जरा--"

" म्हणे दार उघडा ! नाहीं उघडत जा ! मेल्यांनो, अजून पहांट व्हायची आहे—जा—मला नाहीं उठवत !"

" मग काय आम्ही असे बाहेरच उभे राहूं ?"

" उभे कशाला राहतां ? जा हवं तिथं—जा मसणांत !..."

म्हातारीचा आवाज आतां चांगलाच गर्जूं लागला !

मीं म्हटलं, " रजत, स्वागताचा न्याराच नमुना दिसतो आहे ! मग आतां बसायचं कशाला ?—चल जाऊं कुठं तरी दुसरीकडे आणि करूं खटपट ! "

पण रजतच्या चेहऱ्याकडे पाहतांच इथून हलायचा त्याचा बेतच दिसेना. तो निश्चिन्तपणं उंबरठ्यावर बसून राहिला. एक विडी ओढीत तो म्हणाला, " अरे, बस तूं; असा अस्वस्थ कां होतो आहेस ? "

मीं रागावून म्हटलं, इथं असं बसून राहण्यांत कांहीं अर्थ आहे का ?"

" अर्थ नसला तरी सुद्धां इथून हलायचं नाहीं ! बस तूं सुशान्त, जरा डोकं ठिकाणावर ठेऊन विचार तरी करूं. मग काय होतं तें नंतर बघूं—"

मला कसंसंच वाटूं लागलं होतं तरी बसलोंच. नाक मुठींत धरून बसलों. सडलेल्या तागाचा आणि त्या पाण्याचा दुर्गंध नाका-मनांत शिरूं लागला.

माझ्याकडे पाहून रजत नुसता हंसला—-कांहीं बोलला नाहीं.

कांहीं वेळ अशाच निःस्तब्धतेंत गेला. नंतर मागला दरवाजा एकदम उघडला गेला !

मीं पाहिलं. समोर एक थेरडी उभी आहे ! बहुतेक साठी उलटलेली असावी तिची. तिच्या डोक्यावरले केस बहुतेक पिकून गेलेले होते. त्यांच्या जटा झालेल्या होत्या आणि त्या तिच्या कपाळावर येऊन विलक्षण लटकत होत्या. डोळ्यांच्या आसपासचा भाग काळा मिट्ट दिसत होता, पण त्यांतल्या डोळ्यांत तिची लकाकणारी क्रुद्ध नजर होती. कपाळावर आंठ्यांचं जाळं पसरलं होतं. तिच्या पसरट नकट्या नाकावर, आणि खप्पट गालांवर जगांतली सारी कुरूपता जणूं घर करून राहिली होती !

रजत हंसत मुखानं म्हणाला, " झाली आईसाहेबांची झोंप ? "

" झाली एकदांची ! तुला काय रे मेल्या त्याचं ? मरायचंच होतं तर इथं कशाला आलां ? मसणवट नव्हती वाटतं तुम्हांला ? इथं कशाला आलां मला छळायला ?—"

तिचा हा अवतार पाहून माझा संतापाचा पारा चढत होता. रूपककथेंतल्या डाकिणी-राक्षसिणी कधीं पाहिल्या नाहींत मीं. पण या थेरडीला पाहिल्यानंतर तीनशें वर्षांपूर्वी इंग्लंडांतले लोक ज्यांना धरून जाळून टाकीत, तीं माणसं कशीं असतील याचा अंदाज करतां येत होता.

माझ्या अंगचा तिळपापड होत होता; पण रजतकडे पाहिलं तों काय !—अगदीं निर्विकार दिसत होता तो !

रजत म्हणाला, " आई, तुम्हीं आमचं चांगलंच स्वागत केलंत कीं ! आम्हाला ओळखलंत यांत शंकाच नाहीं ! "

" ओळखणार नाहीं तर काय ? तुझी हांक ऐकतांच ओळखलं कीं–हे आलेत मेले काळतोंडे ! आणि आणखी एक सांपडला वाटतं तुमच्या टोळींत—चला—व्हा चालते ! माझ्या घरांत नाहीं थारा मिळायचा !"

" आम्ही नाहीं जाणार ! "

" नाहीं जाणार ? इतकी हिंमत अं ? आत्तां आरडाओरडा करतें आणि गांवांतल्यांना जमवतें ! चला—उठा—व्हा चालते !--" कांचेचं भांडं तडकावं तसा हुंकार करीत म्हातारी आंत नाहींशी झाली !

मीं म्हटलं, " रजत, ऊठ बाबा आतां तरी--"

" हां हां, आतां उठायचंच, चल ऊठ--आपण आंतच बसूं-आतां बाहेर बसायची जरूर नाहीं--!"

" आंत ?"

" हो-दार खुलंच आहे कीं ! मग उगाच—"

" म्हणतोस तरी काय ? त्या म्हातारीनं काय म्हटलं तें ऐकलंस कीं नाहीं ?"

" ऐकलं नाहीं तर काय ? माझे कान चांगले शाबूद आहेत ! चल सुशान्त,--चल-Now or Never ! आली संधि दवडूं नको--!"

त्याचं धैर्य अजबच !

आम्हीं आंत पाऊल टाकलं न टाकलं तोंच म्हातारी फणफणत आमच्या अंगावर धांवून आली. जणूं रणचंडीच !

म्हातारी वसूकन् ओरडत म्हणाली, " पुनः आलांतच का घरांत ? थांबा मेल्यांनो, तुमचं धाडस अजबच दिसतंय !"

मी दचकून बाहेर चाललों; पण रजतनं माझा एक हात घट्ट धरून ठेवला.

नंतर कांहीं न बोलतां ओसरीवर ठाण मांडून बसला. मलाहि त्यानं तसंच बसविलं.

नंतर शांतपणानं म्हणाला, " बरं झालं आंत शिरलों तें ? आतां तूं काय करणार, आई ?"

" तुम्हाला मारून पिटून धक्के देऊन बाहेर घालवणार !"

" बाहेर घालवून देणार ! बघूं कशी देतेस ती ! पण आई, धक्के देशील तेव्हां देशील; आधीं थोडी चहाची व्यवस्था कर ना ! सारी रात्र उपाशीं आहोंत आम्हीं--थंडींत कुडकुडत काढलीय रात्र !"

" काय-चहा !"

म्हातारीनं असा कांहीं चेहरा केला कीं–जन्मभर त्याचा विसर नाहीं पडायचा. तो चेहरा पाहतांच मेला माणूसहि भीतीनं ताड्कन् उठून बसला असता !

" चहा हवाय म्हणे ! थांबा मेल्यांनो, शेणपाण्याचं भांडंच आणून ठेवतें तुमच्यासमोर ! "

म्हातारी सोसाट्याच्या वाऱ्यासारखी दरवाजांतून बाहेर निघून गेली.

मीं म्हटलं, " रजत, पुरे झालं नाहीं का अजूनहि ! "

रजत चेष्टेनं म्हणाला, " पुरे काय व्हायचं ? अरे, ही तर सुरूवात आहे नुसती ! "

" म्हणजे ? इथं जबरदस्तीनं राहायचा विचार आहे कीं काय तुझा ? "

" हो ! त्यावांचून गत्यंतर काय आहे ?

" म्हातारी तर शेणपाणी आणायला गेली ! "

रजतनं माझं म्हणणं न ऐकल्यासारखं केलं. उलट तो म्हणाला, " प्रशान्त, त्या विहिरींतलं पाणी काढ आणि हात तोंड धुवून घे ! आतां येईल बघ चहा ! "

" म्हणतोस काय तूं ? "

" या म्हातारीशीं भांडणं नि तुझी समजूत घालणं––मला नाहीं साधायचं, प्रशान्त ! मी सांगतों तें ऐक मुकाट्यानं. हात तोंड धुवून ये आधीं."

खरंच ! रजतचं सांगणं अगदीं बिनचूक खरं ठरलं !

अर्ध्या तासाभरांत म्हातारी परत आली. दोन्ही हातांत कल्हई केलेल्या दोन वाट्या. त्यांत चहा, पदरांत कुरमुरे !

म्हातारीनं चहाचे वाटगे आमच्यासमोर ठेवले. एका थाळींत पदरांतले कुरमुरे ओतले, आणि फणफणत म्हटलं " घ्या–ओतून घ्या घशांत ! आणि व्हा चालते !"

रजतनं हंसत हंसत चहाचे घोट घेण्यास सुरूवात केली. एक घोट घेतल्यानंतर कुरमुऱ्यांचा बोकणा तोंडांत भरीत तो म्हणाला, " आई, उंदड औक्ष असो तुला !"

म्हातारी त्याला वेडावीत म्हणाली, " तुम्हीं कार्टी मेलांत तर माझं औक्ष वाढेल–सुखानं जगतां येईल मला ! "

मला कसंसंच होत होतं. त्या कल्हईच्या वाटग्यांतील काळ्या रंगाचा गुळाचा चहा मला विषासारखा कडू कडू वाटत होता. पण रजत एकाद्या राजासारखा समोरल्या कुरमुऱ्यांच्या मेजवानीवर हात मारीत होता !

म्हातारीनं केरसुणी हातीं घेतली आणि स्वैंपाकघर झाडायला सुरुवात केली. एकाद्या तरण्याताठ्या मुलीसारखी झपाट्यानं ती काम करीत होती आणि तोंडानं सारखी पुटपुटत होती--"

" काय मेलं माझं नशीब ! उभ्या जगांतलीं सारीं फटारीं माणसं माझ्या घरीं येऊन जमा होतात ! या मेल्यांच्या जाचाकाचामुळं मला म्हातारीला तुरुंगांत जाऊन बसावं लागणार ! त्यापेक्षां--मरण कां नाहीं येत--"

त्यानंतरचे दोन तास कसे गेले ? त्याचं वर्णनच करतां येणं शक्य नाहीं.

म्हातारीची वटवट अखंडितपणं चालू होती. अदम्य उत्साहानं ती शिव्या देऊं लागली. अधून मधून ती विचारी, " काय रे पोरांनो--जातां कीं नाहीं माझ्या घरांतनं ? "

" नाहीं--नाहीं जाणार ! "

" पोलिसांना कळवतें--अन् पकडून देतें--"

" द्या खुशाल ! कशा पकडून देतां तें तरी बघूं !"

" अस्सं काय ! चाललें बघा पोलिस ठाण्यावर--"

मी मुकाट्यानं ओसरीवरच बसून राहिलों. मला कसंसंच वाटत होतं. मला जितकं अधिक वाईट वाटत होतं, तितकाच अधिक आनंद रजतला वाटत होता. म्हातारीला एकदम माझी आठवण झाली नि तिनं माझ्याकडे वळून टक लावून पाहिलं.

" काय रे पोरा, काय तुझं नांव ?"

मीं भीत भीत म्हटलं, " सुशान्त "

" सु--शा--न्त ! मग असा झडल्या कावळ्यासारखा अंधारा-पांधारांत भटकत कां फिरतोयस् ? जा--जा तुझ्या घरीं--"

काय बोलावं तें सुचेना.

पण मी द्यायचं उत्तर रजतनंच दिलं--" नाहीं आई, तो घरीं नाहीं जायचा !"

" मेल्या, काळतोंडया ! तूंच त्याचं माथंहि फिरवून टाकलंयस् वाटतं ! केव्हां यमदेव प्रसन्न होतो नि केव्हां तुला घेऊन जातो कोण जाणें !"

" आई, यमदेव तुला आधीं नेणार ! मग मला !"

" हात मेल्या ! मर तूंच आधीं !" तिच्या तोंडाच्या बोळक्यांत उरलेलं दोन तीन दांत जणूं आम्हाला राक्षसी पद्धतीनं खाऊन टाकण्यासाठींच बाहेर आले ! तिचा तो अवतार पाहून मला भीति वाटत होती. वाटत होतं, केव्हां म्हातारी केरसुणी घेईल नि केव्हां आमच्या पाठी सडकून काढील कोण जाणें !

रजत मात्र निर्विकार चेहऱ्यानं—एका मागून—एक विडी शिलगावीत अंतराळांत धूर सोडीत बसून राहिला.

बऱ्याच वेळानं म्हातारीची बडबड थांबली. बहुधा स्वयंपाकघरांत स्वैंपाकाच्या कामाला लागली असावी ती.

रजत जरा आवाज चढवून म्हणाला, " आई, स्वैंपाक लवकर करा जरा ! अशी भूक लागलीय आम्हाला !—"

" काय म्हणतोस रे काळतोंडया ! स्वैंपाक करूं होय ! " तापल्या भट्टींतून लाही बाहेर येत म्हातारी खेंकसली, " चुलींतली राख आणून ठेवीन नि खायला लावीन ! "

" मग आम्ही देखील तुला राख खायला लावूं, सांगून ठेवतों आधींच !"

तिला काय वाटलं कोण जाणें. अर्ध्या तासानं म्हातारीनं डाळ-तांदूळ, थोडे बटाटे-कांदे, तेल-मोहरी-मीठ आणलं नि आमच्यासमोर आदळलं. म्हणाली, " घ्या हा शिधा आणि करा तुमचा स्वैंपाक ! माझ्या हातचा स्वैंपाक तुम्हा बाबूलोकांना गोड नाहीं लागायचा !"

" आणि चूल ? "

" ती त्या कोंपऱ्यांत आहे बघ. आलांच आहांत घरीं आणि बसलांच ठाण मांडून निलाजऱ्यासारखे, तर करणार काय ? उपाशीं पोटीं तर घालवून नाहीं द्यायचं तुम्हाला ! घ्या हें, करा स्वैंपाक, घाला घशांत नि व्हा चालते ! काय मेल्यांची कटकट तरी ! "

आम्ही दोघे चूल पेटवायला लागलों. माझ्यांत उत्साह बिलकुल उरलेला नव्हता. पण रजत---त्याला कुठून इतका उत्साह आला होता, कुठून इतकी सहनशीलता त्यानं मिळविली होती कोण जाणें ! म्हातारीच्या साऱ्या शिव्या-गाळी तो कसा पचवीत होता कोण जाणें ! सर्वसामान्य माणसाला त्या पचविणं अगदीं अशक्य होतं. कामाच्या निमित्तानं किती तरी गांवांत आम्हाला फिरावं लागे, किती तरी गैरसोयी भोगाव्या लागत, प्रतिकूल परिस्थितीशीं झगडावं लागे. पण त्याचं कांहीं वाटत नसे आम्हाला; पण या खाष्ट म्हातारीच्या तोंडून असा अपमान सहन करून घेत पडून राहण्यांत अर्थ काय ?... माझ्या तर कांहीं लक्षांत येत नव्हतं !

आम्ही दोघेजण जणूं प्राण पणास लावून चूल पेटवीत होतों.

लांकडं ओलीं होतीं; त्यामुळं तीं लौकर पेट घेईनातः धुरानं डोळयांतून पाणी गळूं लागलं. माझ्या मनांत आलं, हा कर्मभोग नुसता म्हातारीचाच नाहीं; आमचाहि आहे ! रजतच्या मनांत काय आहे कोण जाणें ! "

तोंच मागून कर्कश स्वरांत धमकी मिळाली, " हात मेल्यांनों ! घ्या हें ! बस्स झालं---उठा आतां तिथनं. सारे मेले असेच ! म्हणे देशाची सेवा करणार ! कसली सेवा करणार, डोंबलाची ? चूल देखील पेटवायला येत नाहीं तर--काम कसलं करणार---चला---उठा---उठा---!"

रजत आनंदानं म्हणाला, " आई, कशी लक्ष्मी अन्नपूर्णा शोभतेस बघ तूं !"

" चूप रहा काळतोंड्या !" म्हातारी गरजली.

अखेर म्हातारीनंच स्वैंपाक केला, ताटं मांडलीं आणि म्हणाली, " घ्या मेल्यांनो हे पिंड ! टाका पोटांत ! "

रजत मोठ्या खुषीनं ताव मारूं लागला. पण खरं सांगायचं तर एक घांस दिखील गिळवत नव्हता माझ्याच्यानं. सकाळपासून अविश्रांत शिव्या खाल्ल्यामुळं भूक आणि रुचि---दोघांनींहि पळ काढला होता. राहून राहून मनांत येत होतं, या रजतला इथं---राहायचं असेल तर खुशाल राहो---आपण मात्र राहयचं नाहीं क्षणभर देखील. मिळाली संधि कीं काढायचा पळ ! असल्या या सुखापेक्षां--

मी भात चिवडीत होतों, तोंच म्हातारी माझ्या अंगावर ओरडली, " काय रे पोरा ! उतरत नाहीं वाटतं घशाखालीं ? तुमच्यासाठीं एवढं रांधून ठेवलं तें टाकून जाणार वाटतं सारं ! माझ्या डाळ-तांदळांना पैसे नाहींत वाटतं पडत ? "

मी दचकलों, आणि बकाबका ताटांतील भाताचे बोकणे तोंडांत भरूं लागलों.

" असा राक्षसासारखा काय खातोयूस ? नीट खा, नाहीं तर—"

छे: ! कहर केला या म्हातारीनं.

मी कातर नजरेनं रजतकडे पाहूं लागलों.––तो तशाच प्रसन्न, परितृप्त मुखानं खात होता. या म्हातारीच्या शिव्यांचा जणू कांहींहि परिणाम त्याच्यावर होत नव्हता !

जेवणंखाणं आटोपल्यावर आम्ही दोघे जण निघालों. तों म्हातारी अवचित समोर येऊन उभी राहिली.

" कुठं चालले बाबू लोक ? "

रजत उत्तरला, " इथं––गांवांतच !

" हात मेल्यांनो ! लौकरच या परत रात्रीं जेवायला यायचं असेल इथं तर ! समजलं ? रात्रभर तुमची वाट बघत बसण्यासाठीं, तुमच्या सोयीसाठीं, माझ्या या खोपटांत केरोसिन कांहीं स्वस्त नाहीं––! "

रजत हंसला. कांहीं बोलला नाहीं.

रस्त्यावर येतांच मीं म्हटलं, " रजत, माफ कर बाबा ! आतां धीर नाहीं धरवत."

" कां ? जेवणखाण तर कसं फक्कड झालं––! "

" पण असा तोंड दाबून बुक्क्यांचा मार खात, मूठभर भाताच्या आशेनं तिथं पडून राहायचं––याला कांहीं अर्थ आहे का ?"

रजत उत्तरादाखल नुसता हंसला !

" अं––हं ! असं हंसण्यावारी नको नेऊंस ! तुझ्यानं सहन करवतं, मला नाहीं राहवत !"

" अच्छा ! ठीक ! आजची रात्र राहा. गैरसोय झाली तर उद्यां चालूं लागूं इथून !"

रात्रींहि दिवसाचीच पुनरावृत्ति ! म्हातारीनं आग्रह करकरून खिचडी-भात खायला लावला व नंतर म्हणाली, " त्या खोलींत अंथरुणं घालून ठेवलीं आहेत तुमचीं. पडा जाऊन त्यांच्यावर ! उजाडलं कीं मला तुमचीं तोंडं दिसतां कामा नयेत-- समजलं ?--उठा !--"

त्या खोलींत वाशांचं माचण होतं. एका कोंपऱ्यांत रॉकेलचा दिवा मिणमिणत होता. त्याच्या प्रकाशांत त्या माचणावर काथ्याची फाटकी गादी व मळकट उशा दिसल्या ! म्हातारीनं आमच्या झोंपण्याची व्यवस्था केली होती ही !

माझ्या मनांत आलं, " म्हातारी फटकळ असली तरी रीतभात माहित आहे तिला !"

या बिछान्यावर अंग टाकतांच रजत घोरूं लागला !

मी मात्र या कुशीवरून त्या कुशीवर होत राहिलों. केव्हां डोळा लागला, माझं मलाच कळलं नाहीं !

" खुट्ट " अशा आवाजानं माझी झोंपमोड झाली.

समोरच एक खिडकी होती. तींतून डोकावून पाहिलं. जग चांदण्यांत न्हाऊन निघत होतं ! त्या चांदण्यांतच म्हातारी येऊन उभी असल्याचं दिसलं. म्हातारीनं चौकसपणानं एकवार आमच्याकडे पाहिलं; नंतर हळूच दरवाजाची कडी काढली आणि ती बाहेर पडली.

मीं दचकलों, भ्यालों. भीतीची एक तीव्र लहर माझीं हाडं कांपवीत माझ्या शरीरांत चमकून गेली. अशा या मध्यरात्रीं-अवेळीं, आमच्या खोलींत डोकावून पाहण्याचा आणि कडी काढून बाहेर जाण्याचा अर्थ तरी काय ? काय हेतु असेल या थेरडीचा ? पोलिसांत खबर द्यायला तर नाहीं चाललेली ? गेली असेल तिथं—तर आश्चर्य नाहीं !

मीं रजतला हलविलं. पण तो इतक्या गाढ झोंपेंत होता कीं त्याची झोंप मोडण्याचं लक्षण दिसेना. रागारागानं झोंपेंतच मला एक शिवी

हांसडून तो या कुशीवरचा त्या कुशीवर झाला. याच्या कानाशीं नगारा वाजवल्यावांचून स्वारीला जाग यायची नाहीं असं माझ्या मनांत आलं! आतां काय करायचं? मोठीच पंचाईत आली कीं--!

मी उठलों. अगदीं चुपचाप दरवाजा उघडला आणि बाहेर आलों--

म्हातारी कुठं तरी नाहींशी झाली!

पण तिचा शोध फार वेळ करावा लागला नाहीं! ती माझ्यासमोरच चालत असल्याचं दिसलं.

जवळच एक वडाचं झाड होतं. खूप मोठं. वडाखालीं गांवदेवता होती. त्या झाडाच्या दाट अंधारांत देवतेसमोर एक दिवा तेवत होता--त्याच्या प्रकाशांत मला सारं कांहीं दिसलं!

म्हातारीनं देवीसमोर गुडघे टेकले, साष्टांग नमस्कार घातला. नंतर हात जोडून तिनं देवीजवळ गाऱ्हाणं सुरू केलं!

अंधाराआड उभा राहून मला तिचं तें गाऱ्हाणं ऐकूं येत होतं.

म्हातारी देवीची प्रार्थना करीत होती, "देवी आई, या पोरांना उदंड औक्ष दे, सुखी राख! माझीं हीं पोरं--हा रजत, हा सुशान्त, देशाचं दुःख नाहींसं करोत, आमच्यासारख्या गोरगरिबांना, दुःखीपीडितांना ते सुखी करोत! देवी आई, त्यांना आशीर्वाद दे. त्यांचं भलं कर! सोन्यासारखीं हीं मुलं--त्यांच्या अडीअडचणी नाहींशा करून टाक आई! माझ्या रक्तानं तुझी पूजा बांधीन देवी आई--!"

म्हातारीच्या डोळ्यांतून आंसवांचीं टिपं टप् टप् करीत देवाच्या चरणीं पडूं लागलीं.

माझ्याच्यानं तिथं उभं राहवेना.

मी लागलीच तिथून लगबगीनं माघारा आलों.

× × × ×

अंमळ थांबून सुशान्त म्हणाला, रजत या जगांत नाहीं, हें आज देखील म्हातारीला सांगवलं नाहीं. तें सांगायचं साहस करवलं नाहीं!

सत्तर वर्षांची ही जख्खड म्हातारी, "करंटा रजत झोंपडींत येत नाहीं !" म्हणून अजूनहि शिव्या देत असते--त्याला उदंड आयुष्य लाभावं म्हणून देवाकडे मागणं मागत असते !

आमचा खराखुरा देश इथं असतो, असल्या प्रेमळ म्हाताऱ्या कोताऱ्या जिवांतच असतो ! असल्या किती तरी असंख्य माउली गांवोगांव आहेत—त्या माउलींची कूस म्हणजे आमच्यासारख्यांना ऊबदार अंथरूण !"

बाहेर आकाशांत ढगांची दाटी होत होती. त्या ढगांकडे बघत सुशान्तनं एक लांबलचक सुस्कारा सोडला नि म्हटलं, " अरे रंजन, सिगरेट दे बघूं एक !"

## देशमुख आणि कंपनीचीं आगामी पुस्तकें

### वि. स. खांडेकर

अनुवादित वाङ्मय

१ गद्यगीतें
२ वाळूंतील फुलें
३ बंडखोर आत्मे
४ तुरुंगांतील पत्रें–भाग ३

स्वतंत्र वाङ्मय

१ सांजवात
२ हस्ताचा पाऊस
३ समाधीवरील फुलें
४ अश्रु
५ बुद्ध आणि हिटलर
६ चल ये राणी
७ विसावें शतक
८ तिसरी भूक
९ वर्षाकाल
१० छाया–भाग १—२
११ वालुका
१२ माझ्या कादंबऱ्या
१३ चार भिंती
१४ बडी मां
१५ चक्रवर्ति
१६ तिसरा प्रहर
१७ उद्यांचीं स्वप्नें
१८ वटपत्रें
१९ साहित्य साधना
२० श्यामचीं पत्रें
२१ गडकरी ( व्यक्ति आणि वाङ्मय ) ( आवृत्ति २ )
२२ अश्रु आणि हास्य
२३ तृणांकुर २३ ‘ १९४२ ’

### साने गुरुजी

१ स्वर्गीय ठेवा ( आवडत्या गोष्टी भा. ५ )
२ नवजीवन ( ,, ,, भा. ६ ) व आणखी चार भाग
३ इस्लामी संस्कृति
४ चिंतनिका–भाग २ रा

### ग. त्र्यं. माडखोलकर

१ तरुण भारताचा बुद्धियोग
२ हांक
३ तीन दिवस
४ माझे आवडते कवि
५ स्वप्नांतरिता
६ ऊर्वशी
७ उमरखय्याम
८ चक्रवर्ति उदयन
९ विलापिका
१० हें युद्ध !

### दत्त रघुनाथ कवठेकर

१ आपुलकीची झळ
२ ढगाआड
३ आग आणि पाणी
४ नितळलेल्या भावना

### प्र. के. अत्रे

१ हास्यकथा–भाग २ रा
२ ‘ मी ’ कसा झालों
३ वामकुक्षी
४ गीतगंगा

# देशमुख आणि कंपनीचीं आगामी पुस्तकें

**ना. धों. ताम्हनकर**

१ शेजारी

**गोपीनाथ तळवलकर**

१ १९४२ आणि नंतर
२ शॅडोज ऑन दि वॉल

**कृष्णाबाई मोटे**

१ अनामिकेची पूजा
२ कलाक्षेत्रांत
३ मवाली

**अनंत काणेकर**

१ निशिकांताची नवरी
२ ,, ( काव्यसंग्रह )
३ काळे आणि पांढरे

**चिं. वि. जोशी**

१ चाललेंच आहे !
२ दरबार कथा
३ आजीबाई
४ माणुसकी

**दत्तु बांदेकर**

१ अमृतवाणी
२ हिरवी माडी
३ कबुलीजबाब
४ गडी फू
५ मोहनिद्रा

**कुसुमाग्रज**

१ परप्रकाश

**कुसुमावती देशपांडे**

१ दीपकळी

**न. वि. गाडगीळ**

१ कायदे मंडळांतील पांच वर्षें

**लक्ष्मणराव सरदेसाई**

१ मांडवी तूं आटलीस

**स. अ. शुक्ल**

१ पारू

**शांता किर्लोस्कर**

१ माझं बाळ

**काकासाहेब कालेलकर**

१ स्मरणयात्रा
२ अतिथि

**लक्ष्मणशास्त्री जोशी**

१ जोतिबा फुले चरित्र
२ ,, ( लेखसंग्रह )

**अरविंद गोखले**

१ तनुजा
२ नजराणा. ( आवृत्ति २ )

**वा. म. जोशी**

१ रागिणी ( संक्षिप्त )
२ सुशीलेचा देव ,,

**वि. गं. देशपांडे**

१ हें जीवन !

**विभावरी शिरूरकर**

१ हिंदोळयावर
२ कळ्याचें निश्वास

**शकुंतला परांजपे**

१ चांदणी

**पां. वा. गाडगीळ**

१ ( ? ) राजकीय निबंध

**जयप्रकाश नारायण**

१ संघर्ष